पुढें लवकरच सुमुहूर्तावर सीमंतिनी व चित्रांगद यांचा मोठ्या थाटानें विवाह झाला व तो समारंभ पुष्कळ दिवसपर्यंत चालून चित्रवर्म्यानें असंख्य अश्व, गज, रथ; दास, दासी, रत्नें, भूषणें, वस्त्रें शिवाय द्रव्य व वरदक्षिणा हीं जामातास अर्पण केलीं.

विवाहसमारंभ आटपल्यावर चित्रवर्म्यानें वरपक्षाकडील वऱ्हाडीमंडळीचा वस्त्रादिकांनीं मोठा गौरव करून त्यांची रवानगी केली व इंद्रसेनाच्या परवानगीनें विजयादशमी, दिपवाळी इत्यादि सणांनिमित्त जामातास कित्येक दिवस पर्यंत ठेवून घेतलें.

श्वशुरगृहीं असतां एके दिवशीं चित्रांगद कांहीं लोक बरोबर घेऊन यमुनेच्या तीरीं मृगया करण्या करितां गेला. मृगयेमुळें फार श्रम होऊन राजपुत्राला थकवा आला असें पाहून, त्याच्या मुख्य कारभाऱ्यानें तावडतोब एक उत्तम नौका आणविली आणि एक दोन निवडक सेवकांसह राजपुत्राची स्वारी नावेंत बसून जलविहार करण्या करितां निघाली. नौकावाहक राजपुत्रास घेऊन मध्यावर गेले न गेले तों सीमंतिनीच्या दुर्दैवप्राबल्यामुळेंच कीं काय एकाएकीं प्रचंड वारा सुटून नावाड्यांसही ती नौका अनावर झाली. हें पाहून सर्वांच्या तों-

डचें पाणी पळालें. नावाडयांनीं आपली होती तेवढी शिकस्त केली पण तिचा कांहींएक उपयोग न होतां थोडयाच वेळानें ती नौका दिसेनाशी झाली.

झालें, सर्वच आटपलें. सीमंतिनीचा सौभाग्यतरणि अस्ताचलास गेला आणि जिकडे तिकडे मोठा हाहाःकार उडून तें यमुनातीर भयाण स्मशानाप्रमाणें भासूं लागलें.

ही दुःखकारक वार्ता तावडतोब जिकडे तिकडे पसरली. ज्याला थोडया वेळापूर्वीं आपण अगदीं उत्तम स्थितींत पाहिलें; त्या राजजामाताच्या मरणाची भयंकर बातमी प्रथम कोणास खरी सुद्धां वाटेना आणि ती खरी न वाटणें साहजिक होतें. पण उपयोग काय ? खरीच ती ! त्यानें ऐकावी त्याला धसकन धक्का बसावा; त्याचें हृदय करपून जावें आणि कोणाचें करपणार नाहीं ? ही शोकप्रद वार्ता ऐकून जो तो कालिंदीतटाकडे धांवूं लागला. राजा, राणी व सीमंतिनी यांच्यावर हा भयंकर विजेचा लोळ आदळतांच त्यांनीं मोठयानें हंबरडा फोडून धरणीवर अंग टाकिलें. प्रधानादि मंत्री मंडळीनें व सुहृद्-आप्तजनांनीं त्यांस सांवरून त्यांची पुष्कळ प्रकारें समजूत केली, पण व्यर्थ. सीमंतिनी ज्या कर्माला भीत होती तेंच कीं हो आज ओढवलें. हाय ! हाय ! बिचारीच्या

सौभाग्यभांडारावर दरोडा पडून सर्व ऐहिक सुखांचा व मनोरथ यांचा भंग झाल्यामुळें सीमंतिनीला केव्हढें दुःख झालें असेल ह्याची कल्पना वाचकांना होईल तर त्यांनीं करावी; आमच्यानें शब्दांनींही वर्णवत नाहीं.

इकडे इंद्रसेन व लावण्यवती–चित्रांगदाचा पिता व माता–यांना हें वर्तमान कळतांच तींही तेथें आलीं; मग तर सर्वत्रांच्या दुःखशोकाला पारावारच नाहींसा झाला. सर्वांनीं आपल्या जिवाचा हवा तितका अटापीट केला पण परमेश्वरसत्तेपुढें कोणाचाही इलाज नसल्यामुळें शेवटीं ‘ प्रभूची मर्जी ’ असें ह्मणून–चित्रांगदाच्या विरहजन्य दुःखानें हाय हाय करीत तीं आपल्या स्थलीं गेलीं.

मनुष्यावर संकटें येऊं लागलीं ह्मणजे तीं चोहोंकडून येतात. आधींच पुत्रविरहजन्य दुःखानें शोकसागरांत बुडालेल्या इंद्रसेनाला लावण्यवतीसह त्याच्याच दायादानीं प्रतिबंधांत ठेवून त्याचें सर्व राज्य हिरावून घेतलें.

चित्रांगद बुडाल्याचें वरतीं लिहीलेंच आहे. राजपुत्र फार सुंदर व तरुण असल्यामुळें नागकन्यांनीं मोहित होऊन त्याला पाताळांत नेलें. नागभुवनीचें अनुपमेय ऐ-

---

१ पाताळांत नागांचें राज्य आहे अशी पौराणिक कल्पना आहे.

श्वर्य पाहून राजपुत्र आश्चर्यानें थक झाला. नागकन्यांनीं चित्रांगदाला नेऊन आपल्या राजापुढें उभें केलें. राजपुत्रानें नागराजा—तक्षकापुढें साष्टांगनमस्कार घालून त्यास आपली सर्व हकीगत सांगितली. राजपुत्राची हकीगत ऐकून घेऊन तक्षक ह्मणाला—" हे रूपयौवनसंपन्न राजपुत्रा, तुह्मी मर्त्यलोकीं कोणत्या दैवताची उपासना करितां ? " नागश्रेष्ठाचें हें भाषण ऐकून चित्रांगद मोठ्या नम्रतेनें हात जोडून ह्मणाला—" राजाधिराज, आह्मी श्रीशंकराची उपासना करितों. " कश्यपात्मज श्रीशंकराच्या भूषणांपैकींच एक असल्यामुळें आपल्या धन्याचें नांव ऐकतांच नागेंद्राला मोठा आनंद होऊन तो आपली मान डोलवूं लागला व चित्रांगदाला मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन ह्मणाला " राजपुत्रा, तुझ्याविषयीं माझ्या मनांत मोठी प्रीति उत्पन्न झाली आहे; तूं नेहमीं माझ्याजवळ असावेंस असें मला वाटतें. तर हे राजपुत्रा, त्वां येथें सुखानें रहावें; तुला येथें कोणत्याही गोष्टीची न्यूनता नाहीं. " फणिश्रेष्ठाच्या या भाषणावर चित्रांगद ह्मणाला—" राजाधिराज, मजविषयीं आपल्या मनांत प्रेमा उत्पन्न झाला हें पाहून मी आपणाला मोठा दैववान् समजतों, पण माझें इतकें अनुकूल दैव कोठें आहे ! !

महाराज, मी आपल्या मातापित्यांचा एकुलता एक पुत्र असल्यामुळें तीं माझ्या वियोगानें फार दुःखी असतील. माझ्यासाठीं त्यांचा जीव तिळ तिळ तुटत असेल; आणि माझी नवयौवना प्रिया सीमंतिनी तर माझ्या विरहदुःखानें आपले प्राणच त्यागील ( हें बोलत असतां राजपुत्राचे डोळे पाण्यानें भरून आले. ) " यासाठीं या आपल्या दीनदासाला मृत्युलोकीं पोहोंचवावें. "

राजपुत्राचे हे बोल ऐकून तक्षकाला त्याची मोठी कींव आली. त्यानें प्रसन्नचित्तानें--" राजपुत्रा, तुला द्वादशसहस्र नागांचें बळ दिलें आणि जेव्हां तूं माझें स्मरण करशील तेव्हां येऊन मी तुझें साहाय्य करीन " असें सांगून त्यानें राजपुत्राला पुष्कळ अमूल्य वस्तु दिल्या व बरोबर एक नाग देऊन त्याला यमुनेच्या तीरीं आणून सोडिलें.

इकडे सीमंतिनीवर जरी दुःखाचे डोंगर कोसळले होते तरी ऋषिपत्नीनें सांगितलेलें व्रत तिनें मोडलें नाहीं. ती नित्य उपोषित राहून ब्राह्मणभोजन व दंपत्यपूजन करी आणि संध्याकाळीं श्रीशंकराची षोडशोपचारें पूजा केल्यावर आपल्या प्रियपतीचें स्मरण करून थोडा

आहार करी. पतिनिधन झाल्यापासून ती नित्य यमुनास्नांन करीत असे.

पुढें एके दिवशीं सीमंतिनी नित्याप्रमाणें यमुनास्नानास गेली असतां तेथें तिची व एका तरुण पुरुषाची एकाएकीं एक नजर होऊन तीं उभयतां तटस्थवृत्ति धारण करून एकमेकांकडे पहात उभीं राहिलीं. मंगलसूत्ररहित कंठ, कुंकुमविरहित भाल, कज्जलविवर्जित नेत्र असें तें सीमंतिनीचें रूप पाहून त्या तरुण पुरुषास फार वाईट वाटलें; त्याच्या डोळ्यांतून खळखळ अश्रुधारा वाहूं लागल्या. तथापि हें कोणाच्याही लक्षांत येऊं न देतां तो मोठ्या अदबीनें ह्मणाला--"हे स्त्रिये, तूं कोणाची कोण आहेस तें मला सांग; तुझी हकीगत ऐकण्याविषयीं मी फार उत्सुक आहें." त्या तरुण पुरुषाच्या सांगण्यावरून सीमंतिनी आपली हकीगत सांगत असतां तिच्या पोटांत भडभडून आलें; नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागून मुखावाटे शब्दही निघेनासा झाला. सीमंतिनीच्या सख्या फार चतुर होत्या; आपल्या धनिनीची झालेली ही अवस्था पाहून त्यांतील एकजण मोठ्या धैर्यानें पण अदबीने ह्मणाली--" महाराज, या आमच्या धनिनीचा-बाईसाहेबांचा-भ्रतार ( बोट दाखवून ) येथें यमुनेंत बुडा-

ल्यास आज तीन वर्षें होत आलीं. शिवाय सासुसास-ऱ्यालाही त्यांच्याच दायादांनीं प्रतिबंधांत ठेविलें आहे. सीमंतिनीच्या दासीचें हें बोलणें ऐकून चित्रांगदाला दुःखाचा मोठा उमाळा आल्यामुळें तो कांहीं वेळ खालीं मान घालून स्तब्ध उभा राहिला.

इकडे सीमंतिनीनें त्या तरुण पुरुषाच्या नकळत दासीला खूण करून त्याची हकीगत ऐकण्याची इच्छा दर्शविली. हें पाहून, त्याला जरी वरचेवर दुःखाचे उसासे येत होते तरी ते त्यानें आंत दाबून बोलण्यास प्रारंभ केला. तो ह्मणाला–' मी सिद्धपुरुष आहें. भूत, भविष्य, वर्तमान सर्व कांहीं मला समजतें. स्वर्ग, मृत्यु, पाताळ या तिहीं लोकीं पाहिजे तेव्हां मी गमन करितों " असें ह्मणून त्यानें सीमंतिनीचा हात धरिला आणि ह्मणाला–" हे लावण्यलतिके सीमंतिनी, तुझा पति जिवंत असून तो आजपासून तिसऱ्या दिवशीं तुला भेटेल. सीमंतिनी, माझ्या वचनावर तूं विश्वास ठेव. मी सांगितलेलें कधींही असत्य व्हावयाचें नाहीं तथापि तीन दिवस पर्यंत तूं ही गोष्ट गुप्त ठेव. " असें सांगून तो नैषधनगराकडे निघून गेला.

तिकडे नागराजा वृद्ध ब्राह्मणाचें रूप घेऊन राजपुत्र

चित्रांगद परमेश्वराच्या कृपाप्रसादानें ‘ द्वादशसहस्त्र नागबली ’ होऊन आला आहे आणि प्रसंग विशेषीं नागांचा राजा तक्षक त्याचें साहाय्य करण्यास तयार आहे ’ असें सर्वत्र सांगूं लागला. प्रथम या गोष्टीचें सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. पण ज्या अर्थी हा वृद्ध ब्राह्मण सांगतो (त्या काळांत सर्व लोकांचा ब्राह्मणांवर पूर्ण विश्वास होता) त्या अर्थी ती खरीच असावी असें पुष्कळांस वाटलें. मग काय विचारावें ! ! हं हं ह्मणतां ती बातमी सर्वतोमुखीं झाली. ज्यांनीं इंद्रसेन व लावण्यवती यांना कारागृहांत ठेविलें होतें त्यांना हें वर्तमान ऐकून मोठी धास्ती पडली; त्यांनीं इंद्रसेन व लावण्यवती यांची क्षमा मागून त्यांस बंधमुक्त केलें आणि त्यांचें पूर्वीचें सर्व राज्य त्यांच्या स्वाधीन केलें.

चित्रांगद निघाला तो नैषधपुराच्या बाहेर एका मोठ्या रम्य उपवनांत जाऊन उतरला. आपला पुत्र आल्याची बातमी कळतांच इंद्रसेन व लावण्यवती यांना मोठा आनंद होऊन जगच्चालकाच्या अगाध कर्तृत्वाचें मोठें नवल वाटलें. राजाज्ञेनें नगरांत जिकडे तिकडे आनंदोत्सव सुरू झाला. चित्रांगदानें सुमुहूर्त पाहून नगरांत प्रवेश केला; त्यावेळीं प्रजाजनांनीं मोठ्या आनंदानें

राजपुत्रावर सोन्याचीं फुलें उधळलीं. चित्रांगदानें आपल्या मातापित्यांस पहातांच सद्गदित होऊन त्यांच्या चरणीं लोटांगण घातलें. लावण्यवतीला तर पुत्रवात्सल्यामुळें मोठा गहिंवर येऊन तिच्या मुखावाटे शब्दही निघेना; तिनें चित्रांगदाला पोटाशीं धरिलें आणि ज्याप्रमाणें वनवास कंठून चतुर्दश वर्षांनीं श्रीरामचंद्र कौसल्येस भेटले तद्वत सौख्य होऊन लावण्यवती व इंद्रसेन यांना प्रेमाचा जो हुंदका आला तो कांहीं केल्या आंवरेना; कंठ सद्गदित होऊन नेत्रांतून आनंदाच्या अश्रुधारा वाहूं लागल्या. सारांश–तो दिवस सणाप्रमाणें सर्वांस मोठा आनंददायक वाटला.

आतां आपण सीमंतिनीच्या हकीगतीकडे वळूं. सीमंतिनीनें प्रथमच जेव्हां त्या तरुण पुरुषास पाहिलें तेव्हां तिला हाच चित्रांगद असावा असें वाटलें. कांहींही असो. ज्या अर्थीं त्या तरुण सिद्धपुरुषानें हात धरून ‘ सीमंतिनी, तुझा पति जीवंत असून तो आजपासून तिसऱ्या दिवशीं तुला भेटेल; माझ्या वचनावर तूं विश्वास ठेव. मी सांगितलेलें कधींही असत्य व्हावयाचें नाहीं. ’ इ० त्यानें काढिलेल्या उद्गारांवरून तर तिची शंकाच फिटली. पण एकदां मृत झालेला प्राणी पुनः जिवंत होण्याची

आशा नसल्यामुळें ती फिरून मोठ्या विस्मयांत पडली. तिचें मन गोंधळून जाऊन तिला कांहीं सुचेनासें झालें; तिनें परमेश्वराची अनन्यभावें प्रार्थना करून ह्मटलें—
"भो भक्तकामकल्पद्रुम गिरिजारमणा, त्या तरुण सिद्ध पुरुषानें सांगितल्याप्रमाणें तीन दिवसांत माझ्या प्रिय पतीची भेट होईल तर तत्प्रीत्यर्थ तुझ्या नांवानें अकरा लक्ष दंपत्यें पूजीन."

वरील शब्द सीमंतिनीच्या तोंडून निघाले मात्र; तोंच राजपुत्र चित्रांगद नैषधपुरास आल्याचें आनंददायक वर्तमान चित्रवर्म्यास दूतमुखें कळलें. त्यावेळीं राजा, राणी व पतिनिधनदुःखाच्या कष्टतम स्थितींत जिनें तीन वर्षें कंठलीं त्या सीमंतिनीला मोठा आनंद झाला हें सांगावयास नकोच. ही आनंददायक वार्ता आणणाऱ्या हेरास चित्रवर्मानें उत्तम भरजरी पोषाख दिला आणि सर्व नगर शृंगारून ठिकठिकाणीं आनंदोत्सव सुरू केले. सीमंतिनीकरवीं दिव्यालंकार लेववून कंठीं मंगलसूत्र बांधिलें आणि सौभाग्यसंबंधीं करावयाचे ते सर्व उपचार केले.

चित्रांगदाची मृतक्रिया झाली होती ह्मणून जीवनोपाययादि संस्कार पुनः करण्यासाठीं चित्रवर्म्यानें जामातास

बोलावणें पाठविलें. चित्रांगदही आपल्या मातापित्यां-सह मोठ्या लवाजम्यानिशीं श्वशुरगृहीं यावयास निघाला. चित्रांगद येत आहे असें कळतांच चित्रवर्मा आपले सरदार, मानकरी, स्वार, शिबंदी यांसह कित्येक कोस पर्यंत त्यांस सामोरा आला. चित्रांगदास पहातांच चित्रवर्म्याला प्रेमाचा मोठा पूर आला. त्यानें धांवत जाऊन जामताच्या कंठीं मिठी घातली.मग उभयतांचे कुशल-प्रश्न झाल्यावर चित्रवर्म्यानें इंद्रसेन व लावण्यवती यांची मोठ्या आनंदानें भेट घेतली आणि त्यांस मोठ्या समारंभानें मिरवत मिरवत नगरांत आणिलें. चित्रांगद हा गुणवान् व देखणा असल्यामुळें त्याला पहाण्यासाठीं बायकापुरुषांचे दुतर्फा थवेच्या थवे उभे होते. चित्रांगदास पहातांच कित्येक वृद्ध बायांच्या पोटांत पुत्रवात्सल्य उत्पन्न झालें. उपवर झालेल्या सुस्वरूप मुली हात जोडून " जय देवबापा, आह्मांला असाच पति मिळूंदे " असें ह्मणाल्या आणि जिकडे तिकडे सीमंतिनी-विषयीं स्तुतीपर पोंवाडे ऐकूं येऊं लागले.

पुढें राजवाड्यांत गेल्यावर सीमंतिनी व चित्रांगद यांचे जीवनोपाय व विवाहादि संस्कार पुनः झाले; तेव्हां त्यां-वर सुरगणांनीं आकाशांतून सुमनवृष्टि केली आणि प्रजा-

जनांनींही आपली स्वामिनिष्ठा उत्तम प्रकारें व्यक्त केली.

इकडे सीमंतिनी व चित्रांगद यांच्या आनंदाला तर पारावारच नाहींसा झाला; त्यांची एकांतीं गांठ पडल्यावर एकमेकांच्या प्रेमालिंगनांत आनंदाचें भरतें आंवरेना. चित्रांगदानें सीमंतिनीला आपली हकीगत सांगून नागलोकाहून आणिलेले सर्व अलंकार स्वहस्तें लेवविले.

सीमंतिनीनें मोठ्या आनंदानें सासुसासरा, मातापिता आणि वडील आप्तजनांच्या चरणीं मस्तक ठेवून त्यांचे कल्याणप्रद आशीर्वाद घेतले. चित्रांगद व सीमंतिनी यांचा तो रतिमदनतुल्य जोडा पाहून सर्वांस मोठा आनंद झाला आणि ज्यानें हा परमानंदाचा दिवस दाखविला त्या परमेश्वराच्या अगाध करणीचें सर्वांस मोठें कौतुक वाटलें.

याप्रमाणें आनंदांत बरेच दिवस लोटल्यावर चित्रांगद आणि सीमंतिनी यांसह इंद्रसेन नैषधपुरास परत आला. नैषधपुरास आल्यावर इंद्रसेनानें आपले वृद्ध चतुर मंत्री आणि मांडलिकराजे यांच्या विचारानें चित्रांगदास राज्याभिषेक केला व आपण या नरदेहाचें सार्थक व्हावें ह्मणून तपश्चर्या करण्या करितां वनांत गेला.

# वेषधारी दंपत्य.

( सुमेधा आणि स्त्रीरूपी सोमवंत )

मागील गोष्टीचा शेवट गोड झाला हें फार चांगलें झालें. सीमंतिनीची दुःखस्थिती संपून जरी आज ती पतीसह आनंदपर्वताच्या अत्युच्च शिखरावर बसली होती तरी त्याबद्दल तिला यत्किंचितही गर्व नव्हता. स्वभाव पालटण्याला एव्हढें मोठें स्थित्यंतर झालें असूनही तिची मूळचीच वृत्ति कायम राहिली हें प्रत्येकानें पूर्णपणें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. परमेश्वराच्या पूर्ण कृपेचेंच हें फळ आहे असें ती पक्केपणीं जाणत होती आणि तदनुरूप तिचें आचरण ही असे; तिनें आपल्या पतिप्रीत्यर्थ केलेल्या नवसाप्रमाणें अकरालक्ष दंपत्यांची पूजा करण्याचा निश्चय करून तो तावडतोब अमलांतही आणिला.

याप्रमाणें सीमंतिनी दंपत्यपूजन करीत असतां विदर्भ नगरींतील सुमेधा आणि सोमवंत या नांवाचे दोन ब्राह्मणपुत्र दशग्रंथांचा उत्तम अभ्यास करून पितृआज्ञेनें आपल्या देशच्या राजाला भेटावयास गेले. द्विजपुत्रांची विद्वत्ता पाहून वैदर्भराजास मनांत मोठा संतोष वाटला. तो ह्मणाला—“महाराज, आपली विद्वत्ता पाहून

मला मोठा आनंद झाला. आतां आपणाला माझी अशी विनंति आहे कीं, नैषधपुरीं चित्रांगदराजाची धर्मपत्नी सीमंतिनी ' मृत्युंजयमृडानी ' प्रीत्यर्थ नित्य दंपत्यपूजा करीत असते, तर तुह्मां दोघांतून एक पुरूष व एक स्त्री होऊन दंपत्यवेषानें तुह्मीं तेथें जावें ह्मणजे ती तुमचा मोठा सत्कार करून दिव्यालंकारांसह तुमची षोडशोपचारें पूजा करील व दक्षिणा ह्मणून पुष्कळ धन देईल; मग तुह्मी मजकडे या ह्मणजे मीही तुह्मांला अभर करीन. " राजाचें हें विनोदाचें भाषण ऐकून द्विजपुत्रांना मोठें आश्चर्य वाटलें; ते ह्मणाले—" राजाधिराज, पुरुषानें स्त्रीवेष घेणें हें मोठें निंद्य व अनुचित कृत्य असून शिवाय कामिनीवेष घेणाऱ्या पुरुषाला पुनः पुनः तोच जन्म घ्यावा लागतो अशी कडक शास्त्राज्ञा आहे. सारांश, पुरुषानें आपलें पौरुष सांडून बांगड्या भरणें कोणालाही संमत नाहीं. महाराज, आह्मी विप्रसुत, तशांत सर्व धनांमध्यें श्रेष्ठ जें विद्याधन तें आह्मांजवळ परिपूर्ण आहे; त्याच्या योगानें आह्मांला पुष्कळ राजे प्रसन्न होतील. " पण राजाला सीमंतिनीचें सत्व पहावयाचें होतें ह्मणून तो तसें करण्याविषयीं त्यांना पुनः पुनः आग्रह करूं लागला. मग सीमंतिनीसारख्या नि-

स्सिम पतिव्रतेचा पुण्यमहिमा सर्व जगाला कळावा ह्मणून ह्मणा अगर होणार ह्मणून ह्मणा त्यांना तशी बुद्धि झाली. माता, पिता, गुरु आणि राजा यांची आज्ञा कधींही अमान्य करूं नये; या वचनाचा त्या विप्रसुतांना मोह पडून त्यांनीं राजाचें ह्मणणें मान्य केलें.

मग राजानें उत्तम वस्त्रें व अलंकार आणविले; सोमवंतानें स्त्रीवेष घेतला आणि सीमंतिनीचें सत्व पहाण्याकरितांच कीं काय त्या वेषधारी दंपत्यानें नैषधपुरीकडे गमन केलें.

नैषधपुरीस दंपत्यपूजनाचा समारंभ चालल्याची वार्ता ऐकून पुष्कळ दंपत्यें तेथें येत; त्याप्रमाणेंच हें वेषधारी दंपत्यही अगदीं ऐन पूजेच्यावेळीं तेथें येऊन पोहोंचलें. सीमंतिनीनें त्या दंपत्याचा मोठा आदरसत्कार केला, पण यांत कांहींतरी कपट असावें असें त्या साध्वीनें तेव्हांच ताडलें; परंतु आपलें सत्व जाऊं नये ह्मणून तिनें पूजाप्रसंगीं त्या दंपत्याच्या मस्तकीं आपला हस्त ठेविला आणि ‘ हर गौरी ’ असें ह्मणून त्या दंपत्याची षोडशोपचारें पूजा करून सुग्रास भोजन व दक्षिणा ह्मणून पुष्कळ धन दिलें आणि ‘ शिवपार्वती ’ असें मानून त्यांस नमस्कार केला.

पुढें काय प्रकार झाला तो पहा ! तें वेषधारी दंपत्य मोठ्या आनंदानें वैदर्भ नगरीस परत जात असतां वाटेंत त्या स्त्रीरूपी सोमवंताचीं आपल्या पतीशीं-सुमेधाशीं— चाललेलीं विनोदयुक्त भाषणें ऐकून पुष्कळ लोकांस हंसूं येई. याप्रमाणें तीं बरींच दूर गेल्यावर त्यांस एक निबिड कुंजवन लागलें; तें एकांत स्थान पाहतांच स्त्रीरूपी सोमवंताला पंचशरानें आपल्या बाणांनीं घायाळ करून सोडिल्यामुळेंच कीं काय त्यानें सुमेधाच्या कंठीं मिठी घातली. हें पाहून सुमेधा ह्मणाला—“ मित्रा सोमवंता, तूं व मी गुरुबंधु, तशांत दशग्रंथी व ब्रह्मचारी असें असून तूं हें वेड्यासारखें काय करितोस ? अरे मार्गांत जाणारे येणारे लोक आपल्याला पाहून हंसताहेतना ! तर तूं आपला हा स्त्रीवेष टाकून देऊन मजबरोबर निमुटपणीं चल कसा ! त्या बिचाऱ्याला सोमवंताची ‘ सोमवंती ’ झाली हें काय माहीत ! ! सोमवंती कामराजाच्या तडाह्यांत सांपडल्यामुळें बेहोष होऊन जमिनीवर पडली; तें पाहून तो सुमेधानामें ब्राह्मणपुत्र अतिशय घाबरून गेला. आपला मित्र पुरुष नसून स्त्री झाला आहे अशी जेव्हां त्याची खात्री झाली; तेव्हां या गोष्टीचें त्याला मोठें आश्चर्य वाटून पश्चात्तापही झाला. तशांत त्या स्त्रीरूपी सोमवंतानें तर त्याला ‘ त्राहि भगवान ’ करून

सोडिल्यामुळें मी या राजाच्या नादीं लागून आपल्याला कुठला हा गळफांस लावून घेतला असें झालें. आपल्या मूर्खपणाबद्दल सुमेधानें आपली पुष्कळ निर्भत्सना केली. आणि 'इतःपर कोणाच्याही नादीं लागावयाचें नाहीं' असें ह्मणून आपले कान पिरगळले, जीभ चावली आणि आलेलें संकट टाळण्यासाठीं त्यानें परमेश्वराची पुष्कळ प्रार्थना केली.

शेवटीं सुमेधानें त्या स्त्रीरूपी सोमवंताला मोठा धाक दाखवून व बोधाच्या दोन गोष्टी सांगून ह्मटलें-" सोमवंता, आपण आपल्या घरीं जाऊं आणि तेथें या गोष्टीचा विचार करूं." सोमवंत जसा तसा एकदांचा कबूल झाला आणि ते दोघे आपल्या घरीं जावयास निघाले.

घरीं आल्यावर सुमेधानें सोमवंताला त्याच्या पित्याच्या स्वाधीन करून घडलेलें यच्चयावत् वर्तमान त्याला सांगितलें. हातातोंडास आलेला, तशांत विद्वान व एकुलता एकच पुत्र आणि त्याची ही स्थिति पाहून सारस्वतानें-सोमवंताच्या पित्यानें-राजवाड्यांत जाऊन मोठा अनर्थ मांडला आणि राजानें आपला सर्वस्वीं घात केला ह्मणून त्यावर शिव्या-शापांची वृष्टी करून त्या. ब्राह्मणानें प्राणत्यागाचीच वेळ आणिली. हें पाहून राजाला फार वाईट वाटलें. त्यानें आपल्या हातून घडलेल्या य

घोर अपराधाबद्दल त्या ब्राह्मणाचा अनन्यभावें क्षमा मागितली.

हें कृत्रिम सत्य कसें झालें ह्याचें राजाला मोठें आश्चर्य वाटलें; त्यानें या गोष्टीचा पुष्कळ विचार केला पण यांतलें इंगित कांहीं त्याला कळेना; तेव्हां त्यानें नगरांतील सर्व ब्राह्मणांस बोलावून त्यांस सांगितलें कीं, "जेणेंकरून या विप्रसुताला त्याची पूर्वस्थिति प्राप्त होईल असें कडकडीत अनुष्ठान करा." राजाचें हें भाषण ऐकून ब्राह्मण ह्मणाले—"नृपश्रेष्ठा, हें ईश्वरी कर्तृत्व आह्मां मानवांच्या हातून कदापिही फिरावयाचें नाहीं."

ब्रह्मवृंदाच्या या भाषणानें राजालाही पण रागच आला; त्यानें स्वतः सात दिवसपर्यंत निराहार उपोषण करून त्या स्त्रीरूपी सोमवंतासह भयंकर हवन आरंभिलें. पूर्णाहुति होतांच देवीनें प्रत्यक्ष दर्शन दिलें; तेव्हां वैदर्भाधिपतीनें त्या स्त्रीरूपी सोमवंतास पुढें करून व आपण साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली कीं, "मातोश्री, हा सारस्वत नांवाच्या ब्राह्मणाचा एकुलता एक व महाविद्वान् पुत्र असून या हतभाग्या दासाच्या महान अपराधामुळें याला ही स्थिति प्राप्त झाली आहे; तर हे भक्तवत्सले, या शरणागतावर कृपा करून या विप्रसुताला याची पूर्वस्थिति प्राप्त होईल असें कर." राजाचें हें भाषण ऐकून

देवी ह्मणाली–" हे लोकपाला, सीमंतिनी सारख्या निस्सीम पतिव्रतेचें कर्तृत्व फिरविण्यास कोणीही समर्थ नाहीं; या साठीं त्या पतिव्रतेच्या इच्छेनुरूप सुमेधा आणि सोमवंत ( मस्तुन स्त्री ) यांचा विवाह व्हावा हेंच उचित. नृपश्रेष्ठा, सारस्वताच्या वंशवृद्धीस्तव त्याला वेद व शास्त्रसंपन्न असा एक दिव्य पुत्र होईल." असें सांगून ती देवी अंतर्धान पावली.

पुढें लवकरच देवीनें सांगितल्याप्रमाणें सुमेधा व स्त्रीरूपी सोमवंत यांचा विवाह होऊन तीं मोठ्या आनंदानें संसार करूं लागलीं.

वरील गोष्टीवरून आमच्या वाचकांना पुष्कळ बोध होण्यासारखा आहे. पहा; जिनें आपल्या अंगच्या सद्गुणांनीं परमेश्वरास प्रसन्न करून घेऊन आपलें नष्ट झालेलें सौभाग्य पुनः मिळविलें; ज्या पतिव्रतेचें कर्तृत्व फिरविण्यास प्रत्यक्ष देवीही असमर्थ होती; त्या परम साध्वीचें कितीही वर्णन केलें तरी तें अपुरेंच होणार. असो; आमची आमच्या देशबंधु–भगिनींस अशी प्रार्थना आहे कीं, त्यांनींही सीमंतिनीप्रमाणेंच सद्गुणी होऊन लोकादरास पात्र व्हावें.

---

पुरंदरे आणि कंपनीनें मुंबईंत "गणपत कृष्णाजीच्या" प्रे छा.

श्री

# श्रीसीतारामचरित्र.

हें पुस्तक,

श्रीरामविजय ग्रंथाच्या आधारें

वेदशास्त्रसंपन्न

## रा. रा. कृष्णाजी नारायण शास्त्री पाळकर

ह्यांचेकडून लिहून घेऊन

तें

## रा. रा. व्यंकटेश विठ्ठल पै

बुकसेलर, ह्यांनीं,

मुंबईत

**जावजी दादाजी**

यांच्या निर्णयसागर छापखान्यांत छापिलें.

शके १८१८, सन १८९६.



किंमत १ रुपया.

# प्रस्तावना.



प्राचीनकालापासून ह्मणजे रामजन्माच्याही बहुतं कालापूर्वीपासून ह्या श्रीरामचरित्राची सुप्रसिद्धि होती. शिवाय ह्या चरित्रावर एकाच कवीनें रचना केली असें नाहीं, तर वाल्मीक ऋषीचा मूळ आधार धरून प्राचीनपासून शेंकडों श्रीरामभक्त वेगवेगळा ग्रंथ रचीत आले आहेत, व कित्येक कवींनीं ( भक्तांनीं ) आपापल्या आवडीप्रमाणें ह्या एकाच चरित्रास वेगवेगळीं स्वरूपें देऊनही वर्णनें केलीं आहेत. एकानें ह्याची अद्भुत रसानें युक्त रचना करून त्यास अद्भुतरामायण असेंच नांव दिलें आहे. हनुमंतानें नाटकरूपानेंच ह्याची रचना करून हनुमन्नाटक रामायण असेंच त्याला नांव दिलें. अशा रीतीनें कितीएक रामायणसंबंधींच वेगवेगळया नांवानें ग्रंथ रचले गेले आहेत. जसें ऋषींनीं वर्णिलेलें ऋषिरामायण, शेषानें वर्णिलेलें शेषरामायण इ० त्याचप्रमाणें प्राकृत भाषेंत देखील कविश्रेष्ठ मयूरपंतानें वेगवेगळ्या एकशें आठ प्रकारें रामायणें रचलीं आहेत. आणखी सर्वांत श्रेष्ठ ह्मणून ज्यांस महादेव असें नाम प्राप्त झालें तोही निरंतर रामनामीं गुंग होऊन गेला आहे. तस्मात् ह्या रामायणग्रंथाची आणखी ती योग्यता काय वर्णन करावी ?

अशा ह्या परममान्य ग्रंथाचे वर्तमानकालीन महाराष्ट्र भाषेंत तरी वेगवेगळे असे अनेक ग्रंथ कां होऊं नयेत ? न व्हावेत असें ह्मणणारे आपलपोटेच ठरतील. दुसरे कोणी असेंही ह्मणतील कीं, प्राचीन कवींनीं जें केलें तें भक्तीमुळें केलें; येथें तें कांहींच नाहीं.

येथें द्रव्याशा आहे; हें ह्मणणें खरें आहे, परंतु ती द्रव्याशा तरी रामचरित्रावरच अवलंबून. एतावता भक्ति प्रधान ठरतेच परंतु प्राचीनपासून ह्या रामचरित्राचा लौकिक पुष्कळ आहे, हें निर्विवाद आहे. ह्मणून अशा ह्या लोकमान्य ग्रंथास आज सरळ मराठी भाषेचें रूप देऊन अल्पशा मूल्यानेंच हा ग्रंथ लोकसंग्रहास प्राप्त व्हावा असा हा आमचा प्रयत्न आहे. तो श्रीरामचंद्रच पूर्ण करण्यास समर्थ आहेत, ह्मणून हा त्यांच्या चाळीस अध्यायरूप विजयग्रंथाचा अमूल्य रत्नहार त्यांच्या कंठांत घालून अनन्यभावानें मी त्यांस शरण आहें.

ग्रंथकर्ता.



॥ श्रीगणेशाय नमः ॥

# श्रीसीतारामचरित्र.

## मंगलाचरण.

श्रीगणेशसरस्वती ह्यांचे चरणीं नम्र राहून भगवान् जे श्रीगुरु त्यांस मी अनन्यभावें शरण आहें. त्याचप्रमाणें प्रस्तुत ग्रंथाचें जें आदिदैवत भगवान् षड्गुणैश्वर्य सीतापति. रामचंद्र त्यांचे चरणीं अनन्यभावें मी आपलें मस्तक ठेवून हें त्यांचें चरित्र वर्णन करणारा आदिकवि जो वाल्मीकिमहाराज भूतभविष्यज्ञाता त्याचे चरणीं नमन करतों. त्याचप्रमाणें ज्यांना रावरंक समान, कनककांता जे वमनासमान मानणारे असे जे संतमहंत त्यांस साष्टांगेंकरून प्रणिपात करून हें श्रीसीतारामचरित्र वर्णन करण्याची भिक्षा मी त्या सर्वांच्या जवळ मागत आहें. ती ते सर्वसमर्थ महाराज मला देवोत.

॥ श्रीगणेशाय नमः ॥

# श्रीसीतारामचरित्र.

## बालकांड प्रारंभ.

## अध्याय पहिला.

### वाल्मीकीपासून रामचरित्राचा उद्भव.

श्रीरामचरित्र हें अनेक रामभक्तांनीं वर्णन केलें आहे, व ज्यानें तें वर्णन केलें, त्यास त्याचेंच नांव पडलें आहे. जसें शेषरामायण, अगस्तिरामायण, हनुमन्रामायण, (हनुमन्नाटक) पद्मरामायण, भरतरामायण, स्कंदरामायण, अरुणरामायण, अध्यात्मरामायण इत्यादि. परंतु ह्या सर्वांस मूल आधार ह्मटला ह्मणजे वाल्मीकिरामायणाचा होय. हाच काय तो पहिला कवि होय. ग्रंथ पद्यात्मक करण्याचा प्रारंभ झाला तो वाल्मीकापासूनच झाला. त्या वाल्मीकीचा पूर्ण इतिहास असा आहे कीं, तो जातीचा ब्राह्मण असून पुढें वाटमाऱ्या कोळी, कातवडी असा बनला. त्यानें नित्य हातांत तीव्र शस्त्रें घेऊन यात्रेकरू, वगैरे लोकांस ठार मारून त्यांचें द्रव्य हरण करून आनंदानें चरितार्थ चालवावा; कैक वर्षें असा त्याचा क्रम चालला होता. त्यानें इतकीं माणसें मारलीं कीं, त्यांच्या हाडकांचे मोठमोठे ढीग त्याच्या घराजवळ पडून राहिले होते. त्यास मनुष्य मारणें आणि ढेंकूण मारणें सारखेंच वाटे. अशा प्रकारें तो हें दुर्धरकर्म करीत असतां एकदा श्रीनारदमुनि कितीएक ऋषींसहवर्तमान तीर्थयात्रा करीत असतां वाल्मीकाच्या तडाक्यांत सांपडले.

तो तत्काळ शस्त्रें सांवरून ह्यांस आडवा होऊन ह्मणाला, आधीं जें काय द्रव्य तुमचेजवळ असेल तें मुकाट्यानें पुढें ठेवा, नाहीं तर प्राणास मुकून द्रव्यही जाईल. तें त्याचें भयंकर भाषण, उग्र वेष व तीं लखलखीत शस्त्रें पाहतांच ऋषी घाबरून गेले. इतक्यांत नारदस्वामी पुढें होऊन ह्मणाले, रे वाल्या, तूं नित्यशः अशा प्रकारें शेंकडों माणसांचा वध करून द्रव्य हरण करतोस, पण हें जें तूं आजपर्यंत काय पाप केलेंस ह्याला कोणी वांटेकरी आहे काय? द्रव्याला मात्र बायकोपोरें वांटेकरी होतात. आतां तूं ह्मातारा होत आलास; लवकरच तुला आतां मरण येऊन यमपुरीचा मार्ग धरावा लागेल. त्यावेळीं बायकोपोरें, घरदार, द्रव्य, हत्तीघोडे ह्यांचा कांहीं उपयोग होणार नाहीं. यम जेव्हां तुला भयंकर शिक्षा करूं लागेल, तेव्हां कोणी तरीं तुला सोडवायाला येईल काय? तेथें तर चित्रगुप्त जेव्हां तुझ्या पापांची याद यमापुढें तुझ्या देखत वाचील, त्यावेळीं पापाप्रमाणेंच शिक्षा मिळेल. जो पापी तीर्थयात्रांची निंदा करणारा त्यास तप्त ताम्रभूमीवरून बांधून चालवितात, परोपकार न करणारास तरवारीच्या धारेवरून ओढितात, तप्त लोखंडाच्या पुतळ्यास भेटवितात, जीभ तोडतात, भयंकर शस्त्रें टोंचून अंगाचें मांस तोडतात, वाटमारे जे तुझ्यासारखे त्यांना कुंभिपाक नरकांत टाकतात, अशा अनेक प्रकारच्या पातकांस अनेक प्रकारच्या कठीण कठीण शिक्षा देतात, तें सांगावें तरी कोठवर? असो, पण तूंही अशींच घोर पापें केलीं आहेस, तुला तर किती भयंकर शिक्षा होईल ह्याचा नियमच करवत नाहीं. तर आतां तूं आपलें द्रव्य ज्यांना दिलेंस त्यांतून ह्या दुःखाला कोणी वांटेकरी आहे काय ह्मणून विचारून ये. तूं येईपर्यंत आह्मी कोणी एक येथून जात

नाहीं. साधूंच्या दर्शनाचा महिमाच कांहीं विचित्र आहे. असा महादुष्ट वाल्या असतांही नारदाच्या दर्शनाबरोबर त्याचें मन पालटलें, आणि मग तो पश्चात्ताप करीत बायकोमुलांस येऊन विचारूं लागला कीं, आजवर मीं बहुत हत्या करून तुमचीं पोटें भरलीं, हें जें भयंकर पाप मीं केलें त्याबद्दल यमलोकीं मला दंड भोगावा लागेल तर त्या पापाला तुह्मी कोण कोण कसकसे भागीदार होतां तें सांगा पाहूं? तें ऐकतांच सर्वांनीं एकत्र जबाब दिला कीं, तुह्मी पापें करून द्रव्य आणतां किंवा पुण्य करून द्रव्य आणतां हें तुमचें तुह्मांस माहीत. आह्मी तुमच्या भाग्याचे वांटेकरी आहोंत, पापाचे नाहींत. हें ऐकतांच वाल्या खरकन् उतरला. त्याला वाटलें, येवढा नरदेह मला प्राप्त होऊन मीं तो व्यर्थ वालविला. हर हर हर मी व्यर्थ बुडालों! अशा प्रकारें तो अगदीं दीनतेनें धांवत येऊन त्यानें नारदाचे पायांस मिठी घातली व ह्मणाला, हे स्वामिराज मी तुला शरण आलों आहें. मी ह्या पापरूपी समुद्रांत अगदीं बुडून गेलोंच होतों, येवढ्यांत ही आपली चरणरूपी नौका मला आढळली, आतां मला ह्या नौकेंत बसवून पैल तीरीं न्या, येथेंच टाकूं नका. हाय हाय काय मीं पापें केलीं? तीं आतां मला मूर्तिमंत दिसूं लागलीं. अहाहा, हीं पहा तीं कशीं मूर्तिमंत माझ्यापुढें उभीं राहून मला खायाला उठलीं आहेत. वासनारूप विवशी माझ्या गळ्यांत पडली, क्रोधरूपी महिषासुरानें मला कांहींच सुचूं दिलें नाहीं. कामरूप वेताळाची तर झडप माझ्या अंगावर चालूच आहे, येणेंकरून मी अगदीं घाबरून गेलों आहें. ह्यावेळीं आपण पंचाक्षरी होऊन मला ह्या चांडाळांपासून मुक्त करा. ह्याप्रमाणें बोलतांना त्यानें आसवांनीं नारदाचे पाय धुवून टाकले. मग ह्यास

पुराच पश्चात्ताप झाला असें जाणून नारदानें विचार केला कीं, हा जातीचा ब्राह्मण खरा, पण कर्मं करून भ्रष्ट झाला आहे, तर ह्यास आतां रामनामावांचून दुसरें कांहींच उपदेशितां येत नाहीं. असें जाणून त्यानें ह्मटलें कीं, तूं आतां रामनाम जपत बस. येवढें सांगून ती सर्व मंडळी निघून गेली. वाल्या मग तेथेंच 'रामराम' ह्मणत बसला. त्यास इतका काळ लोटला कीं, त्याच्या अंगावर एक वारूळच वाढलें. नंतर एकेवेळीं त्याच ठिकाणीं नारदाची स्वारी आली. तेथें रामशब्दाचा ध्वनि त्यांचे कानीं आला. तोंच त्यांना पूर्ववृत्तांत लक्षांत येऊन त्यांनीं तें वारूळ एकीकडे काढून, वर्मकळा दाबून, वाल्मीकास पूर्ण सावध केलें. तोंच सूर्याप्रमाणें तेजःपुंज श्रीनारदास पाहून वाल्मीकानें त्याचे पाय धरिले. नाममहात्म्यानें त्याचीं सारीं पापें दग्ध झालीं. नामाचा प्रतापच असा कांहीं विलक्षण आहे कीं, त्याचे पुढें पापाचा टिकाव लागायाचाच नाहीं. असो. वाल्याचें अंतःकरण अगदीं शुद्ध झालें. त्यास आपल्या पूर्वकर्मांची आठवण होतांच थरारून त्याचे अंगावर कांटा येई. तेव्हां मग त्यानें आतां काळ कसा कंठावा याबद्दल नारदस्वामींस विनंति केली. ते ह्मणाले, आजपासून एक हजार वर्षांनीं भगवान् विष्णु सूर्यवंशीय दशरथराजाचे उदरीं जन्म पावेल; त्याबद्दलचें तूं भविष्यचरित्र वर्णन कर. ज्याप्रमाणें तूं वर्णन करशील त्याप्रमाणेंच तो आपलें अवतारचरित्र दाखवील. तें ऐकून वाल्मीकानें शंभरकोटी श्लोकांनीं रामायण रचलें. त्या योगानें तो सर्व देवांस मान्य होऊन आदिकवि वाल्मीकीऋषि असें त्याला नांव प्राप्त होऊन त्याचा सर्व ऋषी तसाच मान ठेवूं लागले. ही केवळ त्या महासंत नारदस्वामींची कृपा होय.!

असा अद्वितीय ग्रंथ तयार होतांच स्वर्ग, मृत्यु, पाताळ ह्या तीनही ठिकाणच्या लोकांत तो ग्रंथ आपल्या जवळ असावा असा तंटा लागला. तेव्हां श्रीशंकरानें मध्यस्ती पडून त्याचे तीन वांटे सारखे केले. शेवटीं 'राम' अशीं दोनच अक्षरें उरलीं तीं शंकरानें आपल्याला मागून घेतलीं. त्यांचा त्यास असा कांहीं उपयोग आला कीं, कालकूट विष जें त्यानें प्राशन केलें होतें तें त्यास फार जाचीत असे. परंतु हृदयांत राम, मुखांत रामनाम असें झाल्यामुळें त्या विषास पोटांतही जातां येईना व तोंडांतून बाहेरही पडतां येईना. ह्मणून मग तें भूषणरूप होऊन त्यांच्या कंठांतच दडून राहिलें, तेणेंकरून नीलकंठ असें एक शंकरास नवेंच नांव प्राप्त झालें. असो. अशा ह्या रामायणग्रंथाचें त्यावेळापासून जिकडे तिकडे श्रवण चालू आहे. त्याचा हा सरळ प्राकृतभाषेंत महाराष्ट्रजनांकरितां उतारा करीत आहें.

---

## अध्याय दुसरा.

### रावणादिकांची उत्पत्ति, त्यांचें तप, पराक्रम वगैरे.

ब्रह्मदेवाचा पुत्र पौलस्ती, त्यास देववर्णी स्त्रीपासून विश्रवा नामें पुत्र झाला. त्याचा पुत्र वैश्रवण ( कुबेर ). त्यानें महान् तप करून ब्रह्मदेवास संतुष्ट करून घेतलें. तेणेंकरून समुद्रामध्यें लंका नांवाची नगरी उत्पन्न करून ती ब्रह्मदेवानें कुबेरास दिली. ती दानवांनीं हिरून घेतली, तेव्हां देवांनीं तुंबळ युद्ध करून ती पुन्हा कुबेरास दिली; तेव्हां दैत्य सारे पाताळीं जाऊन राहिले. एकेवेळीं

सुमाळी नांवाचा दैत्य सहजगत्या भूतळीं आला असतां आपली लंकानगरी पाहून परमखेद पावला. व मग मनांत ह्मणाला कीं, कु राचा बाप जो विश्रवा त्यास आपली कन्या देऊन तिला जी संत होईल, तीस सहाय करावें, ह्मणजे ही नगरी सहज हातीं लागे ह्याप्रमाणें त्याचे मनांत येतांच त्यानें चटकन् ब्राह्मणवेष धरु मुलीसह विश्रव्याकडे जाऊन ह्मटलें कीं, मी दीन गरीब आहें, मुलीचें मन आपल्या ठायीं गुंतलें आहे तर आपण हिशीं लग्न क रावें. तें विश्रव्यानें स्त्रीलोभानेंच मान्य केलें. तिचें नांव कैकसं मग काय दोन बायका तेथें कलह ठरलाच. असो. एकदां अस मानाचे वेळीं विश्रवा संध्यावंदनार्थ नदीवर जात असतां तिनें त्या अडवून भोग द्यावा असें ह्मटलें. तो प्रकार पाहतांच तूं दुष्ट निश चरी आहेस, तुला फार दुष्ट अशीच संतति होईल असें त्यानें ह्मणू तिची इच्छा पूर्ण केली. पुढें तिला क्रमानेंच रावण, कुंभकर्ण अं पुत्र झाले. तेणेंकरून तीस खेद होऊन चांगला पुत्र एखादा अ सावा अशी इच्छा पतीस दर्शविली. तेव्हां एक ईश्वरभक्त अस पुत्र होईल ह्मणून विश्रव्यानें तीस आशीर्वाद दिला. तोच बिभी षण. असो. पुढें त्राटिका व शूर्पणखा अशा दोन कन्याही तिल झाल्या. त्याही मोठ्या दुष्टच. कुंभकर्ण हें लेंकरूं जन्मतांच त्यां जी किंकाळी फोडली तेणेंकरून ब्रह्मांड थरारून गेलें. रावणा दहा तोंडें व वीस हात होते. ह्या तिघा पुत्रांनीं वयांत येतां गोकर्णक्षेत्रीं जाऊन तपश्चर्या चालविली. रावणानें शंकराची प्रार्थना कुंभकर्णानें ब्रह्मदेवाची व बिभीषणानें श्रीविष्णूची आराधना चाल विली. तेव्हां ब्रह्मदेवानें येऊन तिघांसही वरदान दिलें.

रावणानें असें मागून घेतलें कीं, देवादिकांस मीं बंदींत ठेवावें

सर्व विद्या, अपार संपत्ति हीं मला प्राप्त असावींत. कुंभकर्णानें निरंतर मला निद्रा प्राप्त व्हावी असें मागितलें. तेव्हां ब्रह्मदेवानें होकार देतांच स्वारी धाडकन् पृथ्वीवर पडून घोरूं लागली. ती जणूं एक डोंगरांची ओळच आहे असें भासे. त्याच्या घोरण्यानें दशदिशा सर्वकाल कलकलून गेल्या असत. त्याच्या श्वासोच्छ्वासाबरोबर रेडे, हत्ती त्याच्या नाकांत जात व बाहेर येत. एकदा त्याच्या नाकांत कोणी शिरला कीं साळ्याच्या घोट्याप्रमाणेंच त्याची दशा, बाहेर येऊन आंत जावें. सुटका ह्मणून तेथून नाहींच. अशी त्याची अवस्था पाहून विश्रव्यास वाटलें कीं, ह्या पोराचा जन्म व्यर्थ गेला! तेव्हां त्यानें ब्रह्मदेवास प्रसन्न करून त्याच्याविषयीं कांहीं तरी कृपा करावी असें ह्मटलें, मग सहा महिन्यांनीं एक दिवस जागा होऊन हा सर्व उपभोग भोगील असें ब्रह्मदेवानें वरदान दिलें. पण काय व्यर्थच सारें. झोंप ह्मणजे ती जडदेहाची समाधीच होय. त्यांतच कुंभकर्णाचा सारा जन्म गेला. असें कुंभकर्णाचें मागणें, हीं एक ईश्वरी मायाच. नाहीं तर रावण व तो मिळून त्रैलोक्य जाळून टाकते. असो. बिभीषणानें मागितलें कीं, सत्समागम, संतसेवा, सदा श्रीविष्णुचिंतन हें मला द्यावें. तेणेंकरून ब्रह्मदेवास संतोष होऊन त्यानें त्यास होकार देऊन ह्मटलें कीं, ह्याचे योगानेंच हा वंश धन्य होईल. ह्याप्रमाणें त्रिवर्गाचें एक मुख्य काम आटोपलें.

ह्यानंतर रावणास पाताळचे सर्व दैत्य येऊन मिळाले. प्रहस्त, महोदर, विद्युज्जिव्ह, जंबुमाळी, वज्रदंष्ट्र, खर, दूषण, त्रिशिर, माल्यवंत असे महान् बलाढ्य दैत्य ते. शिवाय त्यांची सेनाही प्रचंड. मग ते सारे मिळून लंकेवर गेले, परंतु दैत्यांचें तेथें कांहींच चालेना. तेव्हां 'लंका आपणास पाहिजे' अशाबद्दल रावणानें बा-

दाढग्यान उचललाच ता पर्वत. तेव्हां शंकरानें मग भार घालून त्यास पर्वताखालीं दडपून धरलें. तेथें तो एकहजार वर्षे रडत होता. शेवटीं त्यानें बहुत स्तुति केल्यामुळें शंकरानें त्यास सोडून दिलें. एकदा रेवानदीच्या कांठीं तो शिवार्चनास बसला असतां सहस्रार्जुनानें त्या नदीचें पाणी आपल्या हजार हातांनीं तुंबवून धरून रावणाच्या अंगावर तें चालविलें. मग रावणाच्या तोंडांत पाणी जाण्याची वेळ येतांच तो क्रोधानें सहस्रार्जुनाच्या अंगावर धांवला. त्यानें सहज त्याचें मनगट धरून त्यास नेऊन बंदींत टाकलें. तेव्हां पौलस्तीऋषीनें त्यास भिक्षा मागून सोडवून आणलें. एकदा स्वारी बळेंच बळीच्या घरीं गेली, व युद्धाची गोष्ट बोलूं लागली. तेव्हां हिरण्यकशिपूच्या कर्णांतील भूषणें तेथें पडलीं होतीं तीं रावणास उचलावयास सांगितलीं. तीं त्याच्यानें उचलवेनात, पुढें बळीच्या बायकोच्या हातचा फांसाही त्यास उचलेना, तेव्हां तो निमुट तेथून निघून गांवांत हिंडूं लागला. त्यावेळीं तेथील लोक बदाबद त्यास मारूं लागले. एका स्त्रीनें तर हें दहा तोंडांचें मौजदार किडूक म्हणून त्यास कांखेंत धरून ज्याला त्याला मौजच दाखवीत सुटली. त्याला तेथून जातांही येईना. द्वारपाल जवळ येतांच हुसकून आंत घाली. तेव्हां तो बिचारा बळीच्या तबेल्यांत राहून तेथील चणे खाऊन पोट भरूं लागला. कोणी त्याच्या तोंडास काजळ लावून मजेखातर त्यास गांवांतून हिंडवीत. अशी त्याची अवस्था झाली. तेव्हां विश्रव्यानें तेथून त्यास सोडविलें. एकदा तो वालीच्या अंगावरच धांवला. वालीनें चटकन् त्यास कांखेंत मारून चतुःसमुद्रांची यात्रा करून अंगदाच्या पाळण्यावर खेळणें म्हणून टांगून ठेवलें. तेथें अंगदानें त्याची दाढी उपटावी, त्याचे तोंडांत मूत्र उडवावें,

अशी त्याची अवस्था झाली. मग विश्रव्यानें तेथेंही जाऊन भिक्षा मागितली. तेव्हां वालीनें त्याच्या तोंडाला काजळ लावून किंप्किंधेहूनच लंकेंत झोंकून दिलें.

एकदा रावणानें आपला मृत्यु कोणाचे हातून आहे,' असें ब्रह्मदेवास विचारिलें. तो म्हणाला अजराजाचा पुत्र जो दशरथ त्याचे पोटीं श्रीराम हा पुत्र होईल, तो तुझा हंता आहे. तें ऐकून दशरथासच ठार मारण्याचा त्यानें निश्चय केला, व मग तो त्याचे पाळतीलाच राहिला. नंतर थोड्याच दिवसांत दशरथकौसल्येच्या लग्नाचा समारंभ चालू झाला. तेव्हां नारदानें वरील वर्तमान सांगून नवरानवरी व कांहीं लोक जहाजांत बसवून समुद्रांतच तें लग्न लावण्याचें अजपाळराजास सुचविलें. त्याप्रमाणें तो करीत असतां रावणानें घाला घालून जहाज फोडून सर्वांस ठार केलें. व कौसल्येस एका पेटींत घालून ती एका माशाच्या हवालीं करून कृतकृत्यता मानून स्वारी घरीं गेली. इकडे मग असें झालें कीं, दशरथ पाण्यांत पडतांच उसळून वर आला तोंच त्यास त्या फुटक्या जाहजाचा आधार मिळून तो तेथेंच जीव धरून राहिला. तेव्हां लाटेच्या योगानें तो एका बेटास जाऊन लागला. त्याच ठिकाणीं माशानें ती पेटी आणून ठेवली होती, ती उघडून पाहतो तर आंत कौसल्या त्याचे दृष्टी पडली. इतक्यांत नारदानें तेथें उतरून दोघांचें लग्न लावून दोघांसही त्या पेटींत घालून ठेवलें. त्याच वेळीं लंकेंत रावणानें ब्रह्मदेवास ह्मटलें कीं, कां झालें कीं नाहीं तुमचें वचन खोटें. तो ह्मणाला, अरे मघांच दोघांचें लग्न लागलें. रावण ह्मणाला, असें असेल तर मी एकवेळ तुमचें इष्ट पुरवीन. इतकें ह्मणून पेटी आणून उघडून पाहतो तों खरेंच. तें पाहतांच रावण तरवार घेऊन दोघांस

मारावयास तयार झाला. तेव्हां माझें इष्ट देणार तर हें दंपत्य मला दे असें ब्रह्मदेवानें ह्मटलें. मंदोदरीनेंही त्यास अनुमोदन दिलें. तेव्हां रावणानें त्या दोघांस जीवंत सोडून दिलें. सारांश भगवान् हाच बुद्धीचा चालक आहे. असो. मग ब्रह्मदेवानें दशरथकौसल्येस पुष्पकांत घालून इंद्रासह अयोध्येंत जाऊन तेथें दशरथास त्याचे राज्यावर बसविलें.

रावणानें एकदा एका स्त्रीवर बलात्कार केला असतां ब्रह्मदेवानें त्यास असा शाप दिला कीं, पुन्हा जर तूं कोणाच्या स्त्रीवर बलात्कार करशील तर तुझ्या शरीराचे तुकडे होतील. रावणानें आपलीं दुष्ट कृत्यें चालविलींच होतीं. तेणेंकरून सर्व देवऋषि, गाईचें रूप धरून पृथ्वी ह्यांचीं ब्रह्मदेवाकडे गाऱ्हाणीं चालूच होतीं. शेवटीं त्या सर्वांस ब्रह्मदेवानें एकवार क्षीरसागरीं नेलें. तेथें लांब एका बेटावर भगवान्नारायण एका विशाळ मंदिरांत शेषावर शयन करून होते. लक्ष्मी त्यांचे जवळ होतीच. साठ हजार योजनांचा शेषाचा देह असून त्यावर पन्नास हजार योजनांचा देह धरून, भगवान् शयन करून होते. तेथील तेजाकडे सूर्याच्यानेंही पाहवत नव्हतें. असो. ब्रह्मदेवांनीं तेथें समुद्राच्या कडेवर राहूनच स्तुति करून हीं सर्व दुःखें उच्चारलीं. तेव्हां सागरावरूनच असा गंभीर ध्वनि आला कीं, मी दशरथराजाचे पोटीं अवतार घेऊन रावणाचा वध करीन, तुह्मी सर्व देवांनीं वानर, रीस ह्यांचे जन्म घेऊन मला सहाय्य करावें. हें ऐकून सर्वांस मोठा आनंद होऊन ते जयघोष करीतच आपापल्या स्थानीं गेले.

---

# अध्याय तिसरा.



## दशरथाचा उत्कर्ष व मारुतिजन्म.

दशरथ हा मोठा पराक्रमी राजा निवडला. तो कश्यपाचा अंश. व कौसल्या ही कश्यपस्त्रीच पूर्वींची होती. दशरथानें सुमित्रा, कैकेयी, वगैरे सातशें स्त्रिया केल्या होत्या. त्यांतून ह्या तिघीच कायत्या प्रमुख होत्या. कैकेयी ही रूपानें फार सुंदर असून मोठी अभिमानी होती. इतक्या स्त्रिया दशरथास असून कैक वर्षें त्यास संतति झाली नाहीं, तेणेंकरून त्याला फार वाईट वाटत असे. एकदां दशरथास असें स्वप्न पडलें कीं, अन्यायावांचून त्याचेकडून दोन पुरुष व एक स्त्री ह्यांची हत्या झाली. तेव्हां वसिष्ठ हा त्याचा गुरु, त्यास त्यानें सांगून स्वप्नाचा दोष टाळण्यासाठीं तो मृगयानिमित्तानें वनांत गेला. परंतु दिवसभर त्यास शिकार मिळाली नसल्यामुळें तो रात्रीचे वेळीं एका नदीकिनारीं वृक्षावर चढून श्वापदांचा कानोसा घेत बसला. इतक्यांत श्रावणनामें एक मनुष्य मोठा मातृपितृभक्त होता. तो आईबापांस कावडींत बसवून ती खांद्यावर घेऊन तीर्थयात्रा करीत होता. तो त्याच ठिकाणीं कावड श्रमक दूर उतरून वृद्धांस पाणी पाहिजे होतें ह्मणून चंबू घेऊन नदीवर पाणी भरण्यास गेला. त्यांत पाणी भरीत असतां 'बुडबुड असा शब्द होऊं लागला, तो दशरथाचे कानीं येतांच कोणी श्वापद समजून त्यानें चटकन् बाण सोडला. दशरथ हा मोठा शब्दवेधी होता. त्याचा बाण नेमकाच येऊन श्रावणाच्या कुशींत शिरला. तेव्हां त्यानें रामराम ह्मणून अंग टाकलें. ते त्याचे शब्द ऐकतांच

दशरथ घाबरा होऊन जवळ आला. नंतर दोघांनीं एकमेकांस आपली हकीकत कळविली. नंतर श्रावण ह्मणाला, तूं आतां माझ्या वृद्धांस पाणी नेऊन दे आणि त्यांचा सांभाळ कर. तें ऐकून मोठ्या दुःखानें राजा त्या वृद्धांचा शोध करीत चालला. तों तीं दोघें पोरासच हाक मारीत होतीं. राजानें त्यांच्यापुढें पाणी ठेविलें, परंतु तीं पुत्रावांचून पाणी पिईनात. शेवटीं राजानें त्यांस कच्ची हकीकत सांगितली. ती ऐकतांच तूंही पुत्र पुत्र करून प्राण सोडशील असें ह्मणून त्या दोघांनीं प्राण सोडला. इकडे श्रावणाचाही निकाल झाला. नंतर राजा त्यांची व्यवस्था लावून चालला, व ह्यानें तरी पुत्र होईल ह्यांतच आनंद मानिला.

ह्यानंतर बारा वर्षें मोठा दुष्काळ पडला. त्याचें कारण असें कीं, वृषपर्वा राजानें शुक्राचे कृपेनें देवांशीं युद्ध करून सारे मेघ आपले ताब्यांत घेतले होते. त्याचे पुढें देवांचें कांहीं चालेना ह्मणून त्यांनीं दशरथास सहाय्यास बोलाविलें होतें. तेव्हां फारच घोर युद्ध झालें. दशरथानें वृषपर्व्यास तर रणभूमीवर ठरूंच दिलें नाहीं. शुक्राचार्यानें मात्र बरेंच युद्ध केलें, परंतु त्याचाही मुगुट दशरथानें उडवतांच ब्राह्मण घाबरून पळून गेले. अर्थात् मेघ मोकळे होऊन वर्षाव करूं लागले. असो, त्या घोर युद्धांत दशरथाच्या रथाचा आंख मोडून गेला होता, त्यावेळीं कैकेयीनें चाकांतून हात घालून आंख धरला, नाहीं तर दशरथाचा मोडच झाला असता. हें दशरथास मुळींच कांहीं ठाऊक नव्हतें, परंतु युद्ध बंद होतांच हा प्रकार पाहून तो थक्क होऊन गेला, व त्यानें कैकेयीस दोन वर मागावयास सांगितले. ती म्हणाली, जरूरीअंतीं मला जें मागावयाचें तें मागून घेईन. कैकेयीच्या हातांत एवढें सामर्थ्य असण्याचें कारण असें

होतें कीं, माहेरीं असतां तिनें त्या हातानें एका ऋषीस नित्य गंध-पुष्पें वगैरे साहित्य पुरविलें होतें. परंतु एक दिवस त्याच हातानें तिनें तो मुनि ध्यानस्त असतां त्याचे तोंडास काजळ माखलें होतें. तें ऋषीस कळतांच त्यानें तुझेंही तोंड असेंच अपकीर्तीनें काळें होईल असा तिला शाप दिला. पुढें तिच्या आईनें ऋषीची पायधरणी केल्यावरून त्यानें तिचा एक हात यशस्वी होईल असा वर दिला, त्याचा येथें उपयोग झाला. असो, दशरथ विजयी होऊन इंद्रसभेंत गेला असतां इंद्रानें त्याचा बहुत गौरव केला, कैकेयीस यानें एक सूर्यासारखा तेजस्वी मणि दिला. तो ती आपल्या वेणींत घालीत असे. नंतर राजास पुत्रसंतान नाहीं असें बृहस्पतीस समजतांच तो म्हणाला, विभांडकाचा पुत्र जो श्रृंगऋषि ह्याचे कडून पुत्रकामेष्टी यज्ञ कर म्हणजे साक्षात् तुझ्या पोटीं ईश्वर अवतार घेतील; त्या ऋषिकुमाराचें लग्न झालें नाहीं व त्यास व्यवहारमार्ग कांहींच ठाऊक नाहीं तर त्यास मोहूनच आणविलें पाहिजे. तेव्हां इंद्रानें ह्या कामीं अप्सरा पाठविण्याचें कबूल केलें. येणेंकरून दशरथ परम आनंदी होऊन परत आला. त्यावेळीं चोहींकडे पर्जन्य पडून सुभत्ता होऊन गेली होती. तें पाहूनही त्यास परम आनंद झाला.

शृंगऋषीचा प्रकार असा होता कीं, त्याचा बाप विभांडक हा त्यास स्त्रीव्यवहार न कळावा ह्मणून एका खांबावर फळी बसवून तीवर अध्ययन करावयास बसवून आपण नित्यानुष्ठानास जाई. तेथें इंद्रानें पाठविलेल्या उर्वश्यादि अप्सरा येऊन क्रीडा करूं लागल्या व आह्मी ऋषीच आहोंत असें सांगून पहिले दिवशीं त्या निघून गेल्या. नंतर शृंगऋषीनें येथें कोणी ऋषि आले होते असें बापास सांगितलें. तो ह्मणाला असे कोणी ऋषि आले तर त्यांचा

मान ठेवून त्यांचें यथाशक्ति इच्छित पुरवावें. नंतर पुन्हा दुसरे दिवशीं त्या अप्सरा तेथें आल्या असतां स्वारी त्यांचेजवळ जाऊन हें उरावर काय तुमच्या वाढलें आहे ह्मणून विचारूं लागला. त्या ह्मणाल्या तुझ्या डोक्यावर शृंग ह्मणून जसा तूं शृंगऋषि त्याचप्रमाणें आमच्या उरावर गलंडें वाढल्यामुळें आह्मांस गलंडऋषि ह्मणतात, वगैरे प्रकारें त्यास सांगून त्यांनीं त्यास दशरथाचे आश्रमीं नेलें. तेथें सर्व सिद्धता होतीच. दशरथानें शांतानामें एक कन्या पाळली होती ती त्यास देऊन त्याचें लग्न लाविलें. व मग वसिष्ठानुमतें यज्ञ चालू केला. विभांडकास हें अंतर्दृष्टीनें कळतांच तो कोपानेंच दशरथाकडे आला; परंतु मुलाची योग्यता व सुनमुख पाहतांच त्याचा कोप जाऊन त्याला दुप्पट आनंद झाला. असो, चालीप्रमाणें मग यज्ञ समाप्त होतांच अग्नीनें प्रत्यक्ष प्रगटून एक दुधाचें भांडें शृंगऋषीचे हातीं देऊन ह्मटलें, यांत पिंड कालवून ते स्त्रियांस द्यावे. असें सांगून अग्नि गुप्त झाला. नंतर वशिष्ठानें त्याचे सारखे तीन भाग करून मुख्य ज्या राजाच्या तिघी स्त्रिया त्यांस ते पिंड दिले. देतांना पहिला पिंड कौसल्येच्या हातीं दिला. तेणेंकरून कैकेयीस वाईट वाटून ती रुसून बसली, तोंच एका घारीनें तिच्या हातचा पिंड उडविला. तेणेंकरून तर तिला पराकाष्ठेचेंच दुःख झालें. शेवटीं दोघींनीं आपापला अर्धा भाग तिला दिला. मग ते पिंड त्यांनीं खातांच पूर्णाहुती होऊन यज्ञ समाप्त झाला. राजानें बहुत दानधर्म करून ब्राह्मणांस संतुष्ट करून बोळविलें.

कैकेयीच्या हातांतला पिंड जो घारीनें उडविला तो तिच्या तोंडचा पडून वायुगतीनें अंजनीच्या ओंजळींत पडला. पिंड घेणारी घार ही सुवर्चसा नांवें देवांगना होती; तिला ब्रह्मदेवाचा शाप

होता, व हें कृत्य करतांच उद्धार होईल असा उश्शाप होता. त्याप्रमाणें ती उद्धरून गेली. अंजनी ही एक वानरी होती, तिनें सात हजार वर्षें शंकराचें आराधन करून तो प्रसन्न होतांच अजरामर, महाप्रतापी असा पुत्र मागितला. तेव्हां शंकर म्हणाले, तूं येथें अशीच ओंजळ करून बैस, म्हणजे तींत एक दिवस भाताचा पिंड येईल तो तूं खा म्हणजे म्हणतेस त्याप्रमाणेंच तुला पुत्र होईल. तो अकरावा रुद्र माझाच अवतार समज. त्याप्रमाणें अंजनीच्या हातांत पिंड पडतांच तिनें तो भक्षिला, तेणेंकरून ती गरोदर होऊन नऊ महिने पूर्ण होतांच मारुतिराय जन्मले; तो सूर्याप्रमाणें तेजस्वी असे. अंगावर सोन्याचें जानवें व लंगोटी कायमच होती. जन्मतांच त्यानें भूक लागली असें म्हटलें. तेव्हां अंजनी फळें आणण्यासाठीं गेली. तों इकडे सूर्यउदय झाला. हें कांहीं फलच आहे अशा कल्पनेनें तें घेण्यासाठीं मारुतिराय किलाणावर किलाण घेत त्यावर उडाले. तेव्हां राहु, केतु, इंद्र, यम, वगैरे सूर्याचे रक्षणार्थ आले असतां मारुतीनें सर्वांस पिटाळून लाविलें. तरी इंद्रानें त्याच्या हनुवटीवर वज्र मारून त्यास निचेष्ट पाडलें. हें वायूस वाईट वाटून त्यानें सर्वांचीं पोटें कोंडून धरलीं. शेवटीं ब्रह्मदेव, शंकर वगैऱ्यांनीं वायूस बहुत प्रकारें सांगितल्यामुळें त्यानें चलन सुरू केलें. तेव्हां ब्रम्हदेवानें मारुतीस वर दिला कीं, हा ब्रम्हकल्पपर्यंत चिरंजीव राहील, व ब्रम्हशापपाश ह्यास बाधा करणार नाहींत. शंकरानें वर दिला कीं, माझ्या तृतीय नेत्रांतील अग्नि ह्याला जाळणार नाहीं व माझीं त्रिशूळादिक शस्त्रें यास बाधा करणार नाहींत; इंद्रानें वर दिला कीं, माझें वज्र यास बाधणार नाहीं, व त्याच्या हनुवटीस वज्र लागलें ह्यावरून ह्याला हनुमान् नांव पडेल. कुबेर. ह्मणाला

ह्याच्या हातून बहुत राक्षस मरतील. यम ह्मणाला, ह्यास काळत्रयीं माझा दंड बाधा देणार नाहीं. नंतर कधींच न सुकणारी अशी एक दीपमाळा विश्वामित्रानें त्याच्या गळ्यांत घातली. ह्या प्रकारें वरदान देऊन देव गेले, तेव्हां वायु त्या लेंकरास मांडीवर घेऊन स्फुंदत होता, इतक्यांत अंजनी त्यास घेऊन पाजूं लागली.

---

## अध्याय चवथा.

### श्रीरामजन्म.

दशरथानें पुत्रकामेष्टि यज्ञ केला; त्यानंतर थोड्याच दिवसांनीं त्याच्या तिघी स्त्रिया गरोदर राहिल्या. तेव्हां वसिष्ठानें सांगितल्यावरून तो तिघींस डोहाळे विचारण्यास गेला. प्रथमतः कैकेयीकडे जाऊन विचारतां ती ह्मणाली, तुह्मीं माझे डोहाळे काय पुरवावे? मला वाटतें कीं, कौसल्यासुमित्रा ह्यांस होणाऱ्या पुत्रांस रानांत दवडून त्यांचा ठाव मोडावा, व माझ्या पुत्रास राज्य असावें. हें ऐकून राजास उरांत सुरी घातल्याप्रमाणें दुःख होऊन तो मुकाट्यानें तेथून निघून सुमित्रेकडे गेला. तेथें मात्र त्याच्या तप्तमनाची पूर्ण शांति झाली. तिला डोहाळे विचारतांच ती म्हणाली, माझी अशी इच्छा आहे कीं, माझ्या पुत्रानें कौसल्येच्या पुत्राची रात्रंदिवस सेवा करावी. असो, मग पूर्ण संतोषानें कौसल्येकडे येऊन तिला विचारूं लागला, तों ती रामरूप होऊन गेली होती, तेव्हां त्यास तिचेविषयीं मोठी काळजी वाटून गेली; मग तो म्हणाला, कौसल्ये, अशी वेड्यासारखी काय करतेस? सावध हो. लग्नप्रसंगीं रावणानें कसें केलें तें

जाणतेस का? तें रावणाचें नांव ऐकतांच ती क्रोधानें म्हणाली, आणा तें धनुष्य. आतांच रावणास ठार करतें. तेव्हां तर दशरथास फारच भय वाटलें. मग त्यानें वसिष्ठास तेथें बोलाविलें. तेव्हां तिचे गर्भांत भगवान् आहेत असें सांगून त्यानें त्याचें समाधान केलें.

ह्यानंतर नऊ महिने होतांच कौसल्या प्रसूत झाली. त्यावेळीं श्रीरामानें अष्ट वर्षांची मूर्ति धारण करून तिला दर्शन दिलें. तेव्हां ति ं रामाची बहुत स्तुति करून ह्मटलें कीं, भगवंता, तुझें बालपण म ाहावें असा माझा मनोदय आहे. तें ऐकून भगवंतानें उपजत लेंकराचें रूप धारण केलें. अर्थात भगवान् आतां अवतरले. त्यावेळीं चैत्र शु० ९ दोनप्रहरची वेळा होती. राजास हें वर्तमान कळतांच त्यानें आपलें भांडार मुक्त करून मोठाच पुत्रोत्सव चालू े ा. इतक्यांत सुमित्रेस एक व कैकेयीस दोन पुत्र झाले. मग तर दशरथाच्या आनंदास त्रैलोक्यही पुरेनासें झालें. बारा दिवस एकसारखा धर्म चालू होता. नंतर वसिष्ठानुमतें कौसल्येच्या पुत्राचें नांव रामचंद्र, सुमित्रेच्या पुत्राचें नांव लक्ष्मण व कैकेयीच्या पुत्राचें नांव भरत व शत्रुघ्न अशीं नांवें ठेवलीं. राम हा तर साक्षात् भगवंताचाच अवतार, लक्ष्मण हा शेषाचा, शंख हा भरत व सुदर्शन हा शत्रुघ्न असे त्याचे अवतार होते. वसिष्ठानें रामाची पत्रिका करून पुढील सारें भविष्य वर्तवून सांगितलें, तेणेंकरून दशरथास परम समाधान झालें.

# अध्याय पाचवा.



## विश्वामित्राचें आगमन.

दशरथाचे घरांत एकही पोर नव्हतें तों चार पुत्र त्याला झाले. त्यामुळें त्याचा सगळा वेळ आनंदांत व पोरांबरोबर खेळण्यांतच जाऊं लागला. अयोध्येंत राम अवतरतांच वृक्षलता सदा प्रफुल्लित झाल्या. गायी हव्या तेव्हां दूध देऊं लागल्या. नगरीला कांहीं विचित्रच शोभा आली. लक्ष्मीच त्याठिकाणीं भरली. इकडे लंकेंत वेळोवेळ उत्पात होऊं लागले, रावणाचे डोक्यांचे मुगुट पडत, त्याला वाईटसाईट स्वप्नें पडूं लागलीं. मंदोदरीसही तशींच दुष्ट स्वप्नें पडूं लागलीं. तेव्हां रावणानें लंकेचा नीटनेटका बंदोबस्त चालू केला. व त्याचें मन त्या दिवसापासून बरेंच घाबरून गेलें.

इकडे हीं मुलें रांगूं लागून त्यांनीं घर अगदीं थोडें करून सोडलें. क्षणमात्र मातींतच खेळावें, चौघेही एकामागें एक धांवत, तें पाहून कौसल्यादशरथांस आनंद होऊन दशरथास आभाळ ठेंगणें झालें. दिवसामासा ते चौघे पुत्र वाढत जाऊन त्यांनीं फारच चमत्कारिक बाळलीला चालविली. एक वेळां शिक्यावरील दहींही चोरून खाल्लें. तेव्हां कौसल्या त्यांचे मागें धांवत गेली. असो. त्या चौघांनीं छोटीं छोटीं धनुष्यें घेऊन एकामागें एक बाण सोडीत धांवावें. हें पाहून त्यांस कोठें ठेवूं व कोठें न ठेवूं असें दशरथास व त्यांच्या मातांस वाटे. अशा प्रकारें बाळलीला करतां करतां त्यांचें मौंजीबंधनास योग्य वय झालेलें पाहून दशरथानें मोठ्या थाटानें त्यांच्या मौंजी केल्या. तेव्हां अपार धर्म व अन्नशांति झाली.

नंतर जन्माचे सोंगाप्रमाणें वसिष्ठापासून भगवान् वेदविद्या शिकले. व मग तीर्थयात्रानिमित्त बाहेर पडून काश्यादिक असंख्य तीर्थे करून रामचंद्र घरीं आले. ह्यानंतर त्यांस बारावें वर्ष लागलें—ह्या वर्षापासून श्रीरामचंद्राची वृत्ति अगदींच बदलली, खेळणें, चेष्टा करणें हें त्यांनीं वर्ज केलें, नेहमीं एकांत असून काल घालवावा. तिघे बंधु त्यांचे सेवेंत अगदीं तत्पर असत.

एके वेळीं प्रतिसृष्टिकर्ता जो विश्वामित्रऋषि तो दशरथाकडे आला. राजानें तत्काल त्यास सामोरें जाऊन मंदिरीं आणून वस्त्रादि अलंकारेंकरून त्याची पूजा केली. व मग तो ह्मणाला, आपल्या दर्शनेंकरून मी संतुष्ट झालों, तर ज्या हेतूनें आपण येथें आलां असाल तें सांगा. मी आपली इच्छा पुरविण्यास तत्पर आहें. तें ऐकून ऋषि ह्मणाला तूं सूर्यवंशाचें भूषण आहेस, तुझें सदोदित कल्याण असो व देवब्राह्मणांचे ठायीं तुझी भक्ति वाढून त्रैलोक्य तुझी कीर्ति वर्णन करो. असो राजा माझा येण्याचा हेतु हा आहे कीं, अलीकडे आमच्या आश्रमांत राक्षस फार पीडा करतात, मारीच, ताटका, सुबाहु इत्यादिकांनीं फारच प्रलय मांडला आहे, होमद्रव्यें खाऊन टाकतात, रक्त, मांस, हाडें यांचा तर वेदिकेवर पर्जन्यच पाडतात. हें असोच पण आश्रमांतील गायी ब्राह्मण; ह्यांस कडाकड खाऊन टाकतात, ह्या करितां रामचंद्रास यज्ञरक्षणासाठीं माझ्या बरोबर दे. ते शब्द राजास मोठेच अणखर लागले. तो ह्मणाला ऋषिमहाराज राम अजून लेंकरूं आहे. तो राक्षसांस कसा हटवील, मी सेना घेऊन तेथें येतों. ऋषि ह्मणाला, तें मला कांहीं नको, रामच मला पाहिजे. राजा ह्मणाला, तुह्मी माझा प्राण मागेल तर मागा परंतु रामास मला देववणार नाहीं. तेव्हां ऋषि क्रो-

धान ह्मणाला रे तूं सूर्यवंशाला कलंक लावितोस, एकदम माझें इच्छित पुरवीन असें ह्मणून मग मला नाहीं सांगतोस, धिक्कार असो तुला, अरे ह्याच वंशांतील राजा हरिश्चंद्रानें स्वप्नांत मला राज्य दिलें, तरी तें दिलेंच; शेवटीं डोंबाचे घरीं राहून माझी दक्षणा पण दिली. तो खरा धन्य. असो जातों मी. तुह्मी वसिष्ठास विचारून कांहीं विचार करणें असेल तर पहा. असें बोलून तेथून निघाला. राजास तेंही दुःख होऊन त्यानें मोठ्या दुःखानें वसिष्ठास हें कळविलें. तेव्हां वसिष्ठानें राम हा प्रतापी पुरुष आहे अशी त्याची खात्री करून रामलक्ष्मणांसही देण्यास सांगितलें. तेणेंकरून राजास अतिशय समाधान वाटून रामलक्ष्मणांसही देतों ह्मणून सांगितलें. तेणेंकरून विश्वामित्रास परम आनंद झाला. नंतर रामास सभेंत बोलावून आणलें. त्यावेळीं तो घननीळ तेजाचा केवळ गोळा अशाला पाहातांच सर्वांचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून गेले. रामानें येतांच सर्वांस नमस्कार केला.

---

## अध्याय सहावा.

### ईश्वरी मायेचें विंदान.

नतर श्रीरामचंद्र विश्वामित्रास ह्मणाला, आपण मला यज्ञरक्षणार्थ नेत आहांत तें ठीक आहे. परंतु माझे ठायीं अद्याप ज्ञानाचा कांहींच लेश नाहीं. आत्मप्राप्ति मला अझून झाली नाहीं. त्यावांचून व्यर्थ आहे. सारा वेळ मी ह्याच गोष्टीचा अलीकडे विचार करीत असतों, तर ह्यासंबंधी कांहीं ज्ञान मला आपण कळवाल तरच मात्र ठीक वाटून मी आपलें कार्य साधण्यास योग्य हो-

ईन. त्यावेळीं ते रामाचे शब्द ऐकून विश्वामित्र ह्मणाले, तूं सर्व जाणता आहेस, आतां घेतल्या सोंगाची संपादणी करण्यासाठींच हें तूं बोलतोस तेंही योग्यच आहे, तर श्रीवसिष्ठ तुझी इच्छा पूर्ण करतील. मग वसिष्ठानें रामास बहुत ज्ञान सांगितलें. ती एक योगवासिष्ठ ह्मणून वेगळाच ग्रंथ आहे, महाप्रचंड तो ग्रंथ. असो. मग माया माया ह्मणतात तें काय ह्मणून रामानें प्रश्न केला. तेव्हां वसिष्ठ ह्मणाले, ते सर्व तुझेच खेळ आहेत, ऐक तुला ह्याबद्दल एक गोष्ट सांगतों. गौतमाचा गाधीनामें एक शिष्य होता, तो मोठा वेदवेत्ता होता, त्यानें मायेचें विंदान कसें आहे हें जाणण्याविषयीं ईश्वराची बहुत प्रार्थना केली. तेव्हां ईश्वरानें त्याची चांगलीच खात्री केली. तें असें कीं:—गाधी एकवेळ गंगेंत स्नान करीत असतां त्यास तेथें तसाच ठेवून मायेनें आपलें कौतुक दाखविण्यास आरंभ केला. जसा तो मृत होऊन यमलोकीं गेला, तेथें कैक कालपर्यंत घोर यातना भोगून मग महाराच्या कुलांत त्याचा जन्म झाला. त्याचें नांव कंटज; तेथें तो बायकोमुलांसह चैनींत असतां एकाएकीं दुष्काळ पडून त्याचीं सर्व माणसें मृत झालीं. नंतर तो दुःखानें व्याप्त होऊन अन्न अन्न करीत हिंडूं लागला, तो केरळ नगरीं आला. तेथील राजा निपुत्रिक मरण पावला. तेव्हां प्रधानानें एका हत्तिणीच्या सोंडेंत माळ देऊन ती ज्याला ती माळ घालील त्यासच राजा करावयाचें ठरविलें. ती माळ हत्तिणीनें ह्या कंटजाचे गळ्यांत घातली. अर्थात् तो राजा झाला. त्यानें सहा वर्षें राज्य करून सर्व भ्रष्टाकार केला. एकदां तो एकटाच गांवाबाहेर गेला. तोंच त्यास त्याच्या गांवचे महार लोक भेटून त्यांनीं त्यास ओळखून ह्मटलें, रे कंटज महारा, काय तूं येथचा राजा झालास? तो ह्मणाला

हें खबरदार जर तुह्मी येथें असें कांहीं कोणाशीं बोललां तर, मी तुह्मांस जबर शिक्षा देईन. राजा एकटा बाहेर पडतांच प्रधानादिक हळूच त्याच्या मागें गेले; त्यांनीं हा संवाद ऐकून आपण सर्व भ्रष्ट झालों असें सत्य मानिलें. नंतर सर्व गांवभर ही वार्ता जाऊन सर्वांसच परम खेद होऊन बहुतेक म्हातारीं स्त्रीपुरुषें ह्यांनीं अग्नींत उड्या टाकून प्राण दिले. तेथें नुसतीं बालकें मात्र उरलीं. हें पाहून ह्याला कारण आपणच आहोंत असें जाणून कंटजानेंही अग्निप्रवेश केला, तोंच त्याच्या हाताला चटका बसून टटारून फोड येऊन तो तेथून उडाला, तोच हा गाधी गंगेतून वर येऊन विचार करूं लागला कीं, हें काय? मी तर येथें नुकताच स्नानास आलों, व आंत बुडी मारतों तर काय चमत्कारिक प्रकार मीं पाहिले. बरें खोटें मानावें तर हाताला भाजण्याचे फोड दिसतात. खरें मानावें तर स्नानांत एक घटका पण पुरी गेली नाहीं. असा तो विचारांत पडून उदास मनानें आश्रमांत गेला. त्याला मग कांहींच सुचेना. एकदां त्याचा गुरुबंधु त्याचे घरीं आला. त्यास कोठून आलां, जाणें कोठें असें गाधीनें विचारतांच तो ह्मणाला, काय सांगूं? मी मोठ्या कष्टानें हल्लीं तीर्थयात्रा करीत हिंडत आहें. कांकीं, मी नुकताच केरळनगरीं गेलों होतों. तेथें वृद्ध मनुष्य कोणीच नाहीं. सारींच पोरें आहेत, तेथें मी एकाचे घरीं जेवलों. नंतर चौकशी करतां कंटज महार येथें राजा होता, त्यानें आह्मांस बाटविलें. वगैरे गाधीचा पूर्वमजकूर सांगून ह्मणाला, अशा दोषाचें निरसन होण्यासाठीं मी तीर्थयात्रा करण्याचा संकल्प करून हिंडत आहें. तें ऐकून तर गाधीला फारच दुःख झालें, मग त्यानें केरळदेशीं व आपल्या जन्मगांवीं जाऊन पाहिलें तो त्याच्या सर्व खुणा त्याच्या त्याला पटल्या.

त्यावरून त्याला परम खेद होऊन तो प्राणत्याग करूं लागला. तेव्हां भगवंतानें मग त्यास भेटून शुद्धीवर आणलें. ह्याप्रमाणें सांगून वसिष्ठानें आणखी सृष्टीची उपत्ति लय वगैरे कसकसे होतात तें सारें रामाचें रामापुढें वर्णन केलें. तें ऐकतां ऐकतां भगवंताची अठरा दिवस समाधी लागली. नंतर विश्वामित्र, वसिष्ठ ह्यानें त्यास सावध केलें. नंतर विश्वामित्र रामलक्ष्मणांसह रथांत बसून आपले आश्रमाकडे चालता झाला.

---

## अध्याय सातवा.

### ताटकावध, विश्वामित्रमखरक्षण, अहिल्योद्धार.

रामलक्ष्मण, विश्वामित्र हे जातां जातां भागीरथीतीरीं उतरले. तेथें नित्यानुष्ठानें आटोपून ऋषीनें रामास सर्व अस्त्रें उपदेशिलीं. धनुर्वेद उपदेशिला व ते पुढें चालले, तों ताटकेचें अरण्य लागलें. तेव्हां ऋषि उगीचच भिऊन ह्मणाले. अरेरे! रामा, हा रस्ता चुकला, हें ताटकेचें अरण्य आहे. ती मोठी दुष्ट आहे, तर रथ मागें फिरवून दुसऱ्या वाटेनेंच नेला पाहिजे. तेव्हां राम ह्मणाले, अशा दुर्जनास भिऊन पळायचें असेल तर मला घरींच नेऊन घाला. त्यांना मारण्यासाठींच मला आपण आणलें, आज्ञा द्याल तर ताटका येतांच तिचा निकाल उडवितों. तें ऐकून विश्वामित्रास आनंद वाटून त्यानें रथ तसाच पुढें चालविला, तेव्हां ताटकाही त्याच मार्गानें ओरडत आली. ती कुंभकर्णाची बहीण, पर्वतप्राय विशाल तिचें शरीर, तोंड तर जसा एकादा बोगदाच. हरबऱ्यांप्रमाणें मनुष्य, गायी, वांसरें ती

कडाकड फोडून खात होती; रक्त वस्त्रानें तिचें अंग लेपडून गेलें होतें. गळ्यांत शिरांच्या माळा होत्या, कानांतही शिरें गुंतविलीं होतीं अशी ती कितीएक राक्षसींसह गर्जना करीतच त्या मार्गानें येत होती. त्यावेळीं ऋषीनें आज्ञा देतांच रामानें अर्धचंद्राकार बाण सोडून तिचें शिर उडविलें, तेव्हां तिनें फारच भयंकर गर्जना करून देह टाकिला. तेव्हां धुरळा उडून आकाशपाताळ एक होऊन गेलें. येणेंकरून राम हा खरा ईश्वर आहे व आतां राक्षसांचा तो अंत करील असें विश्वामित्रास पक्कें वाटून तो मोठ्या आनंदानेंच आश्रमीं गेला. नंतर त्यानें सर्व सिद्धता करून यज्ञ चालू केला. मग रात्रीचे वेळीं रामलक्ष्मण धनुष्य सज्ज करून तयार राहिले. तों कोट्यावधि राक्षस गर्जना करीत व दगड, रक्त, मांस, हाडें यांची वेदिकेवर वृष्टि करीत धांवले. तेव्हां ब्राह्मण गर्भगलित होऊन एकच धांदल उडाली. कशाचा यज्ञ आणि कशाचीं अवदानें? जो तो जीव लपविण्याच्या उद्योगास लागला. परंतु रामचंद्रानें त्यांचा धाक तत्कालच दूर केला. त्यानें यज्ञमंडपावर चढून चौफेर बाणांचा वर्षाव चालू केला. तेणेंकरून इकडेतिकडे राक्षसांचीं प्रेतेंच प्रेतें होऊन गेलीं. सुबाहु व मारीच हे दोन ह्या कामांतले मोठे प्रमुख होते. त्यांपैकीं रामानें सुबाहु तर ठार केलाच, पण त्याला मारलेल्या बाणांच्या पिसाऱ्यांच्या धक्क्यानें मारीच जो गिरक्या खात उडाला तो समुद्रांतच जाऊन आपटला. त्यानें मग हा सर्व प्रकार रावणास कळवून स्वारी गोकर्णक्षेत्रीं तप करण्यासच गेली. ह्याप्रमाणें रामानें त्या रात्रीं ऋषीच्या आश्रमाभोंवतीं राक्षसांचीं प्रेतें पाडून त्यांना रक्षिलें. सकाळीं ऋषि हें पाहून अगदीं चकित झाले. इतक्यांत भूतावळींनीं तीं प्रेतें पार खाऊन नाहींतशीं केलीं. दुसरे दिवशीं ऋषीनें यथासांग यज्ञ पूर्ण

केला. मग विश्वामित्रानें सर्व ब्राह्मणांस दक्षिणा, वस्त्रें, भोजनें देऊन संतुष्ट केलें. हा प्रकार इकडे होत आहे तोंच जनकराजाकडून कन्येच्या स्वयंवरनिमित्त सर्व ऋषींसह येण्याची विश्वामित्रास कुंकुमांकित पत्रिका आली. ह्मणून तो कितीएक ऋषि व रामलक्ष्मण ह्यांस घेऊन मिथिलेकडे चालला. तेथें वाटेनें जात असतां एका प्रचंड शिळेवर रामचरणांची धूळ जाऊन ती स्त्रीरूप पावून रामास नमन करूं लागली. तेव्हां हा काय प्रकार आहे ह्मणून रामानें विचारल्यावरून विश्वामित्र ह्मणाला. ही गौतम ऋषिची पत्नी अहल्या आहे. ही ब्रह्मदेवाची कन्या. ही अशी रूपसंपन्न असल्यामुळें जो सर्वांच्या आधीं पृथ्वी-प्रदक्षिणा करून येईल त्यासच ही द्यावयाची असा त्यानें पण केला. तो ऐकून इंद्र, यम, वायु, वगैरे कैकजण धडपडत पळूं लागले. इतक्यांत गौतममुनि गंगेवर स्नानसंध्या आटोपून उठत आहे तोंच द्विमुख गाय त्याचे दृष्टीस पडली. त्यानें तीस नमस्कारपूर्वक तीन प्रदक्षिणा घातल्या. ती गाय कशाची? ती पृथ्वीच गोरूप धारण करून तेथें आली होती. हें ब्रह्मदेवाच्या लक्षांत येतांच त्यानें गौतमाचा योग्य अधिकार जाणून त्याशीं अहल्येचें लग्न लाविलें. लग्न लागत आहे तोंच इंद्र धडपडत तेथें येऊन धडकला व हा प्रकार पाहून अगदीं विरस पावून एकवार तरी अहल्येस भोगीन असें त्यानें ह्मटलें. नंतर कितीएक दिवस गेल्यावर, गौतम ग्रहणनिमित्तानें गंगेवर स्नानास जाऊन नित्यानुष्ठानास बसला असतां इंद्र गौतमाचें रूप घेऊन त्याचे पत्नीशीं रत झाला. इतक्यांत गौतमही तेथें आला. तेव्हां हा प्रकार त्याचे ध्यानांत येतांच त्यानें इंद्रास सहस्र भगें होतील असा शाप दिला, व बायकोस शिळा होऊन

पडण्याचा शाप दिला. परंतु रामचरणस्पर्शानें उद्धार होईल असें सांगून ठेवलें होतें. तो हा प्रकार झाला. येवढें विश्वामित्र बोलत आहे तोंच गौतमही तेथें येऊन पोंचला. मग त्यानें स्त्रीचा स्वीकार करून रामास बहुत आशीर्वाद दिले. तिकडे इंद्राचें असें झालें कीं, सर्व देवांनीं गौतमाची बहुत विनंति करून हजार भगांचे हजार डोळेच इंद्राला करवून घेतले. असो. ह्याप्रमाणें अहल्येचा उद्धार करून ही मंडळी पुढें चालली. गौतमाचा पुत्र शतानंद हा जनकाचा उपाध्याय, तोही त्यांचेबरोबर निघाला. अशी ही सर्व मंडळी मिथिलेस जाऊन बाहेर एका बागेंत उतरली, तेव्हां त्यांचे कानीं असें वर्तमान आलें कीं, शिवधनुष्यास जो गुण चढवील त्यास जानकी द्यावयाची, हें ऐकून रामचंद्रानें जानकीबद्दल व अशा घोर पणाबद्दल माहिती विचारल्यावरून विश्वामित्र ह्मणाला, पूर्वी पद्माक्ष नामें एक राजा होता, त्यानें लक्ष्मीची आराधना करून तूं माझी कन्या हो असें ह्मटलें. ती ह्मणाली, ह्याबद्दल तुजवर बहुत संकटें येतील. तें त्यानें मान्य केलें. मग लक्ष्मीनें त्यास महाळुंगफळ दिलें. त्यांतून नऊ महिन्यांनीं एक सुंदर कन्या निघाली. ती उपवर होतांच इंद्रचंद्रादिक तिला मागूं आले. तेव्हां मेघश्यामालाच ही मी देणार असें राजानें सर्वांस सांगितलें. त्यामुळें कैक राजे एकत्र मिळून पद्माक्षावर चालून गेले. तेव्हां सात दिवस प्रचंड युद्ध होऊन राजा मरण पावला. नंतर पद्माक्षीनें अग्निकुंडांत उडी टाकली. ह्यानंतर एकेवेळीं ती सहज बाहेर हिंडत असतां रावणानें तिला पाहून तीवर झडप घातली. तोंच ती कुंडांत गुप्त झाली. रावणानें तेथें पुष्कळ उकरून पाहिलें, तों फक्त त्यास पांच अमोल रत्नें मात्र सांपडलीं. तीं त्यानें नेऊन पेटींत घालून ठेवलीं. नंतर

मंदोदरीच्या महालांत जाऊन 'तुजसाठीं अमोल रत्नें आणिलीं आहेत असें सांगून त्यांनीं तिला ती पेटी दाखविली. पण ती त्या दोघांनाही उघडेना व हालेना, तेव्हां त्यांस मोठें आश्चर्य वाटून गेलें. नंतर ती पेटी प्रहस्त प्रधानानें उघडली, तों आंतून ती कन्या निघाली. तिला पाहतांच ही मोठीच घातक आहे, हिला कोठें दूर टाकून द्या असें सांगितलें. तेव्हां रावणानें तिला त्या पेटींत घालून ती जनकाच्या नगरींतील एका शेतांत पुरून ठेवली. इकडे जनकानें ती जमीन एका ब्राह्मणास दान दिली. तो तींत नांगर चालवीत असतां नांगराच्या सीताला ती पेटी लागली, ती त्यानें जनकाकडे नेऊन दिली. ती उघडतांच आंतून ही मुलगी बाहेर निघाली, ती जनकानें ब्राह्मणाजवळून मागून घेतली; तीच ही जनककन्या सीता होय. जनकाचे घरीं एकदां भार्गवराम सहज आले. त्यांचेजवळ शिवकोदंड होतें, तें त्यांनीं एका कोंपऱ्यांत उभें केलें होतें. त्याचें घोडें करून सीता इया इया करीत पळत होती. हें भार्गव व जनक ह्यांनीं पाहून तोंडांत बोटें घातलीं. हे आपणास पाहतात असें पाहून सीता तेथेंच तें टाकून पळाली, तें मग कोणाच्यानेंही ढळेना. तेव्हां पुन्हां सीतेकडूनच तें उचलून एके ठिकाणीं ठेवलें. तेव्हां भार्गव ह्मणाले, जनका, आतां आमचा अवतार संपला. आतां हें धनुष्य येथेंच ठेवितों. ह्यास जो वीर गुण चढवील त्यालाच ही कन्या दे. याप्रमाणें सांगून भार्गव तेथून गेले, त्यामुळें जनकास असा पण करावा लागला. ह्याप्रमाणें सांगून विश्वामित्र ह्मणाला, रामचंद्रा, ह्या साऱ्या तुझ्याच लीला तुला ठाऊक असून उगाच आह्मांकडून बोलवून घेतोस. धन्य आहेस तूं.



# अध्याय आठवा.



## सीतास्वयंवर.

ज्या दिवशीं विश्वामित्र मिथिलेंत गेला त्याचे दुसरे दिवशींच स्वयंवराचा संकल्प होता. त्याप्रमाणें रंगमंडपीं संपूर्ण लोक आले. राजे, ऋषि यांहींकरून मंडप भरून गेला. विश्वामित्रही दोघां रघुकुमारांसह तेथें गेला होता, त्यांस पहातांच जनकास मोठें कौतुक वाटून सीतेस अशा प्रकारचा पति असावा असें तो मानूं लागला. मग शोध करितां विश्वामित्रानें रामाचे पराक्रम, कुल वगैरे सर्व कांहीं त्यास सांगितलें. असो, जनकानें मग मोठ्या कष्टानें शेंकडों हत्तींच्या जोड्या लावून तें धनुष्य रंगमंडपीं आणून ठेविलें व सीतेसही सर्व अलंकारांनीं युक्त करून हत्तिणीवर बसवून तेथें आणविलें. नंतर जो कोणी ह्या धनुष्यास गुण जोडील त्यासच ही माझी कन्या माळ घालील असें ह्मटलें. तें ऐकतांच सारेच राजे जागचेजागीं चूप बसले. कोणी जागचा हालेना. इतक्यांत रावण तेथें आला व ह्मणाला, ज्या गड्यानें कैलासपर्वत उचलला त्याचेपुढें ह्या कारटीची बिशाद ती काय! असें ह्मणून धनुष्य उचलावयास गेला. इतक्यांत सीतेनें पार्वतीचें स्तवन करून तें धनुष्य अधिक जड होण्यासाठीं त्यावर कात्यायनीस गुप्तपणें बसविलें. रावण धनुष्य उचलूं पाहतो तों त्यास तें जागचें सरकवेना देखील, तरी मोठ्या कष्टानें त्यानें तें उभें केलें. परंतु तें नीट सांवरवेना, इतक्यांत तोल जाऊन तें त्याच्या उरावर आदळलें. तेणेंकरून तो धाडकन् खालीं पडला. धनुष्यही त्याचे उरावर पडलें, ह्याप्रमाणें होतांच त्याचा प्राण कासावीस

झाला. त्याला तेथून सुटतां येईना. शेवटीं विश्वामित्रानें सांगितल्यावरून श्रीराम पुढें सरले. त्यांना पाहतांच फक्त त्यांच्या सौंदर्यानें लोकांस आनंद झाला. परंतु धनुष्य उचलण्याची भ्रांतच वाटली; पण तो भ्रम रामानें तेव्हांच नाहींसा केला. हत्ती जसा ऊंस उचलून मोडतो त्याचप्रमाणें रामचंद्रानें पटकन् तें धनुष्य उचलून काडकन् मोडलें. त्याच्या ध्वनीनें ब्रह्मांड कडकडून गेलें, हें पहातांच सर्वांसच आनंद झाला. रावण मात्र रडतच माघारा गेला. असो. मग सीतेनें तत्काळ रामाचे कंठांत माळ घातली. ह्याप्रमाणें होतांच जनक व विश्वामित्र ह्यांनीं कच्चा मजकूर लिहून एक पत्र व एक कुंकुमांकित पत्रिका अशीं दोन पत्रें अयोध्येस रवाना करून दिलीं. तीं पत्रें राजा दशरथाचे हातीं येतांच त्यांतील मजकूर वाचून त्यास त्रिभुवनांत सांठवेना असा आनंद झाला. मग तो वसिष्ठानुमतें सर्व तयारी करून प्रचंड सेना घेऊन मिथिलेस येऊन पोंचला. त्या वेळीं भरत, शत्रुघ्न असे आणखी दोघे पुत्र पाहूनही जनकास परम आनंद झाला. जनकाच्या भावाला आणखी दोन कन्या व आणखी एक जनकासही होती, अशा चौघी कन्या जनकाचे घरीं लग्नाला योग्य झाल्या होत्या. दशरथाकडेही चार वर होतेच. त्यामुळें चौघांच्याही लग्नांचा निश्चय होऊन मोठ्याच समारंभानें तीं लग्नें झालीं. सोहळा, दानधर्म, अन्नशांति हींही उत्तमच झालीं. समर्थांचीं लग्नें तेथें कमी काय असणार! ह्याप्रमाणें चार दिवस उत्तम थाट उडून दशरथ चारही ओहोरें घेऊन अयोध्येकडे चालता झाला. जनकही त्यास पोंचविण्यासाठीं गांवाबाहेर आला.

श्रीमंतांचीं लग्नें, तेथें भांडणकज्जा कशाला होईल? त्यामुळें कलहप्रिय नारदास कांहींच गोड वाटलें नाहीं. म्हणून त्यानें बदरि

काश्रमीं जाऊन परशुरामास त्र्यंबकधनुष्य मोडल्याबद्दल बळेंच राग आणून ह्यांच्यावर आणविलें. तो क्षत्रियांचा द्वेष्टा तेथें येतांच लोकांची दाणादाण होऊन गेली. हें पाहून रामचंद्र पुढें सरले, तेव्हां परशुराम कोपानें ह्मणाला, रे ताटिका स्त्रीचा वध करून वीरता मिरविणाऱ्या, तुला ह्मणावें काय? राम ह्मणाले, मी तर क्षत्रियच आहें, पण तूं ब्राह्मण असून लोकांच्या हत्या केल्यास ह्याला काय ह्मणावें? मीं ताटका ही स्त्री मारिली खरी, पण ती माझी आई तरी नव्हती, तूं तर प्रत्यक्ष आईलाच मारिलीस. तें ऐकून भार्गव चवताळून रामाचे अंगावर बाण सोडूं लागला, पण ते त्याच्या अंगाला न लागतां पायांजवळच येऊन पडत. ह्यामुळें परशुराम हतवीर्य होऊन रामास भेटून परत गेला. नंतर रामचंद्र मोठ्या आनंदानें अयोध्येंत येऊन पोंचले. दशरथानें अयोध्येंतही मोठाच उत्साह केला. दानधर्मही बहुत केला, नंतर मोठ्या आनंदानें तो रामाकडे पाहून कालक्रमणा करूं लागला.

## बालकांड समाप्त.



# अयोध्याकांडप्रारंभ.

## अध्याय नववा.

---

### श्रीरामराज्यवियोग.

दशरथाच्या चौघांही मुलांचीं लग्नें झालीं. सर्व पाहुणे आपल्या गांवीं गेले. कैकयीचा भाऊ सुधाजित् हाही लग्नास आला होता. त्यानें जातांना राजास विचारून भरत व शत्रुघ्न ह्यांना आपले घरीं कांहीं दिवस नेलें. इकडे रामलक्ष्मण धनुर्विद्येचा अभ्यास करूं लागले; वसिष्ठ हा त्यांचा गुरु, जें जें शिकवावें तें तें त्यांना पाठ असेच. असो, मग एक वेळ मोठा थोरला रत्नखचित मांडव घालून तेथें दोघांच्याही युद्धकौशल्याची राजानें परीक्षा पाहिली. ते अचुक बाण मारणें, हत्तीघोड्यांवर बसणें, मंडळाकार फिरून युद्ध करणें, सर्व अस्त्रें शस्त्रें इत्यादि प्रकार रामचंद्रानें असे कांहीं दाखविले कीं साऱ्या त्रैलोक्यांत त्याच्या बरोबरीचा कोणीच योद्धा नाहीं अशी सर्वांची खात्री होऊन गेली.

ह्यानंतर कांहीं दिवसांनीं एकवेळ दशरथ राजा आरशांत चेहरा पाहात असतां त्याला आपल्या दाढीचा केंस एक पांढरा दिसला. ह्मणून त्यानें आपण आतां वृद्ध झालों, करितां श्रीरामास राज्याभिषेक करावा असा विचार करून वसिष्ठास आपला हेतु दर्शित केला. वसिष्ठानेंही तत्काल सर्व सिद्धताच चालविली. कितीएक राजेलोकांना सूचना पाठविल्या. नंतर चैत्रमासीं गुरुपुष्ययोग पाहून तोच मुहूर्त कायम केला. मग आतां उद्यां श्रीराम राज्याव[र] बसावयाचे तों सर्व राजे करभार घेऊन अयोध्येंत आले. नग[र]

जिकडेतिकडे आनंद होऊन राहिला. इतक्यांत देवाजीच्या इच्छेप्रमाणें व्हावयाचें तेंच होण्याला आरंभ झाला. कैकेयीच्या प्रीतींतली एक मंथरानांमें दासी होती. तिच्याठायीं देवांच्या हेतूमुळें विकल्पाची वस्ती होऊन भलभलतेच विचार करीत ती कैकयीकडे येऊन ह्मणाली, गे कैकेयी, तूं अशी स्वस्थ काय बसलीस? उद्यां रामास राज्य मिळणार. दशरथानें तुझीं पोरें बाहेरगांवीं घालवून पहा हें कसें काम चालविलें आहे तें. रामाच्या हातीं राज्य गेलें कीं, खुशाल भरतशत्रुघ्नांनीं त्याचे जोडे उचलावेत आणि तूं कौसल्येचीं लुगडीं धुवावींस. असा प्रकार कायम ठरला ह्मणून समज. बरोबर हा कालपर्यंत कैकेयीच्या मनांत रामाविषयीं मत्सर नव्हता. तिला रामास राज्याभिषेक होत आहे तेणेंकरून आनंद वाटत असे व भरतापेक्षां तिची रामावरच प्रीति फार होती. परंतु मंथरेनें एका क्षणांत तिचा स्वभाव अगदींच पालटून टाकला. तिला मंथरेचें भाषण अक्षरशः खरें वाटूं लागलें. व ती ह्मणाली मंथरे, तूंच खरी माझें हित पाहणारी आहेस. तुला मीं सर्व देह अर्पण केला तरी तुझे उपकार फिटावयाचे नाहींत. असो. पण आतां ह्या गोष्टीला उपाय काय करावा? मंथरा ह्मणाली, उपाय तुझ्या स्वाधीनच आहे. तुला दशरथानें दोन वर दिले आहेत, एका वरानें रामास चवदा वर्षें अरण्यांत पाठवून दे, व एका वरानें भरतास राज्य मागून घे. राम वनांत गेला ह्मणजे लक्ष्मण त्याचे बरोबर जाणारच. तेथें ते एखादे वेळीं राक्षसांच्या तोंडांत पडून जातील. हें ऐकून तर कैकेयीस मंथरेला कोठें ठेवूं असें होऊन गेलें. मग ती वस्त्रें, डागिने एकीकडे फेंकून जमिनीवर पडून राहिली, केंश मोकळे केले. असा कडे प्रकार होत आहे तोंच दशरथ नियमाप्रमाणें रात्रीं तिचे मं-

# अध्याय दहावा.



## श्रीराम अरण्यांत गमन करितात.

श्रीरामचंद्रानें सुमंतास विचारल्यामुळें त्यानें ह्मटलें कीं, आपणास कैकेयीच्या मंदिरांत सरकारानें बोलाविलें आहे. तेव्हां रामचंद्र तत्काल रथांत बसून चालते झाले. कोट्यावधि मदन ज्याचेवरून ओंवाळून टाकावे असें तें सुंदर रुपडें पाहून व आज स्वारी राज्याचा अधिकार पावणार ह्यासाठीं सर्व लोकांस आनंदाचे पूर लोटले. विद्युल्लतेप्रमाणें ज्याचीं वस्त्रें, आजानुबाहू, मंदस्मितमुख असा तो रामचंद्र रथांत बसून निघतांच त्याचेपुढें छप्पन देशींचे राजे धांवत आहेत, वाद्यांचे गजर होत आहेत असा तो कैकेयीच्या मंदिरीं येऊन बरोबरच्या परिवारास बाहेरच उभें करून आपण सुमंत व लक्ष्मण यांसह आंत गेला, तों राजा जमिनीवर मूर्च्छित पडला आहे, त्याच्या डोळ्यांतून अश्रु वहात आहेत, असें पाहून राजास व कैकेयीस नमस्कार केला व राजाची अशी अवस्था होण्याचें कारण काय ह्मणून त्यानें कैकेयीस विचारलें. ती ह्मणाली, राजानें मला दोन वर दिले होते, ते मी मागत असतां त्यास परम दुःख होऊन अशी त्याची अवस्था झाली आहे. राम ह्मणाला, सांग काय तें मला, मी त्याचें वचन पूर्ण करीन. ती ह्मणाली, चौदा वर्षेंपर्यंत तूं लक्ष्मणासह वनांत जावें, व माझ्या पुत्रानें राज्य करावें. तें ऐकतांच राम ह्मणाले, एव्हढेंच, हा मी तयार आहें, मातेची आज्ञा कधीं मोडूं नये. संन्यास घेतला तरी मातेची शुश्रूषा केलीच पाहिजे. व भरत मला प्राणापेक्षांही प्रिय आहे, त्यानें खु-

शाल राज्य करावें. या वेळीं लक्ष्मणास मनस्वी क्रोध आला, परंतु त्यानें राजाची भीड धरून चटकन् क्रोध आंवरून धरला. असो, 'रामचंद्र मग तेथून निघून कौसल्येचे मंदिरीं आला; व तीस नमन करून सर्व वर्तमान तिला त्यानें सांगितलें. त्यावेळीं 'जणूं वज्रच तिच्या अंगावर कोसळलें असें तीस होऊन ती धाडकन् पृथ्वी-वर पडली व ह्मणाली, माझ्या लाडक्या! तूं मला टाकून रानांत जाऊं नको. लागेल तर माझ्या पुष्पवाटिकेमध्यें चौदा वर्षें तूं गुप्त-पणें रहा. राम ह्मणाले आई, तसें नव्हे. मला दंडकारण्यांतच गेलें पाहिजे, बापाचें भाषण खरें करवत नाहीं तो पुत्र काय कामाचा? तर आई, आतां तूं मला आज्ञा दे, असें बोलून त्यानें तिला नमन केलें. त्या वेळीं धबाधब कौसल्या उरावर मारून घेऊं लागली. इकडे हें वर्तमान गांवभर झालें. तेव्हां राम वनांत गेला तर दशरथ प्राण-त्याग करील असें सर्वांस वाटून एकाएकीं अयोध्येंतील आनंदाच्या आरोळ्या बंद होऊनजिकडेतिकडे शोकाच्या आरोळ्या चालू झाल्या. तेव्हां तर लक्ष्मणाचा क्रोधाग्नि भडकून तो ह्मणाला,रामचंद्रा! ह्या साऱ्या अनर्थाला कारण कैकेयी आहे, तूं आज्ञा दे, आतां तिचें मुंडकें उड-वितों. राम ह्मणाले, छी, छी, वेड्या कौसल्यासुमित्रांप्रमाणेंच कै-केयी आपणांस वंद्य आहे. प्राण गेला तरी असे विपरीत तर्क करूं नये. लक्ष्मण ह्मणाला, बरें तर, मला आपण बरोबर न्या, नाहीं तर मी प्राण ठेवणार नाहीं.. सुमित्रा ह्मणाली, •रामा' एवढें ऐकच, लक्ष्मणावांचून तूं रानांत जाऊं नको. लक्ष्मणानें तुझी सेवाचाकरी करावी ह्यांतच मला परम आनंद आहे. असें बोलतांना 'तिचा कंठ दाटून आला. लक्ष्मणानेंही ऊर्मिलेचें समाधान करून तयारी केली. असें पाहून कौसल्येस शोक आंवरेना. ती ह्मणाली, रामा, अरे तूं

वनांत कसारे रहाशील? तुला भूक लागेल तेव्हां खायाला कोण देईल? तुला राक्षस मारतील कींरे! रामा, तुझी अवस्था तरी काय होईल? कमलाहून कोमल तुझे पाय, ते रानांत कसे धड रहातील? हाय हाय!' हे पृथ्वी, हा तुझा जांवयी आहे, ह्याचेसाठीं तूं मृदुपणा धर, खडे कांटे यांस राहूं देऊं नको. हे पंचमहाभूतांनो, तुह्मीं आपली निर्दयता रामाकारणें दूर ठेवा. सूर्या, हा तुझ्या वंशाचा अंकुर ह्याला आपली उष्णता बाधूं देऊं नको. हे अष्टदिक्पाळहो, हे शंकरा, तुह्मी माझ्या बालकाला संभाळा. असें बोलून रामास बाधा होऊं नये ह्मणून तिनें त्याचे हातांत कांहीं वनस्पती बांधिल्या, व ह्मणाली, रामा! चौदा वर्षें मी आतां देह कसारे पाळूं? माझ्या तान्ह्या, नकोच तूं वनांत जाऊं! अशा प्रकारें ती शोकातुर झाली असतां आकाशवाणी झाली कीं, गे कौसल्ये, हा राम साक्षात् शेषशायी भगवान् अवतरला आहे, तो सर्वदां विजयीच आहे. त्याला काळही थरथरां भीत आहे. कां तूं व्यर्थ शोक करितेस? तें ऐकून कौसल्येस कांहीं वेळ बरें वाटलें. नंतर रामानें सीतेकडे येऊन कच्चा मजकूर सांगून ह्मटलें कीं, आतां तूं आपल्या सासूची सेवा करून असावें. ती ह्मणाली, आपल्या चरणांस सोडून दूर राहिल्यास माझा प्राण रहाणार नाहीं. करितां मला आपण बरोबर नेलेंच पाहिजे. असें बोलून ती आधींच घराबाहेर निघाली. असो, मग रामानें आपली 'संपत्ति ब्राह्मणांस दिली. गुरूचे गृहीं अपार द्रव्य पाठविलें. गुरुपुत्रासही पुष्कळ अलंकारभूषणें दिलीं. सीतेनेंही गुरूच्या सुनेस आपलीं अलंकारवस्त्रें दिलीं. रामानें सीतेला न्यावयाचें तर स्वीकारलेंच, पण गुरूची आज्ञा तिचेकडून घेववून मग गुरूच्या सांगण्यावरून कबूल केलें. नंतर रामानें इष्टमित्र ह्यांचें समाधान

करून ते तिघेही दशरथाकडे गेले. ह्या वेळीं सर्व अयोध्यानगर शोकाक्रांत होऊन गेलें. त्यांना पाहातांच दशरथ ह्मणाला, तूं वनांत जातोस पण मी आतां प्राण ठेवणार नाहीं. असो, सैन्य तरी थोडें बरोबर असूंदे. राम ह्मणाले, मी आतां तपासाठीं अरण्यांत जाणार, वल्कलें वापरणार, तेथें मला सैन्याची काय जरूर आहे? इतक्यांत कैकेयीनें त्यांच्यापुढें तीन वल्कलें ठेवलीं, तीं रामलक्ष्मणांनीं तर धारण केलीं. मग कैकेयी सीतेलाही ह्मणाली, तूं हें वल्कल नेस. तें ऐकतांच तिनेंही वल्कल धारण केलें. तें तिच्या त्या कोमल गात्रांना फारच रुतूं लागलें. कैकेयीनें झटकन् तिचें वस्त्र घरांत नेऊन ठेवलें. तेव्हां राजा ह्मणाला, चांडाळणी कैकेयी! मी वचनांत गुंतलों गे. नाहीं तर तुझें डोचकें फोडलेंच असतें. असो, चल, नीघ घरांतून जा. बाजारांत माल मांडून बैस. असो, सुमंता! ह्यांना रथांत बसवूनच घेऊन जा. जानकी, तुझी अरण्यांत काय गे अवस्था होईल? आतां मी काय करूं? ह्याप्रमाणें तो शोक करीत आहे तोंच रामचंद्र रथांत बसून चालता झाला. तेव्हां राणिवशांत एकच आरड झाली. दशरथकौसल्या तर वेड्याप्रमाणें होऊन रामा रामा ह्मणत गांवभर धांवत सुटलीं. अरे माझा राम दाखवारे एकवेळ, त्याला अंमळ थांबवारे, असें ह्मणत धडाधड रस्त्यांतच पडत. हर हर हर! काय ती त्या दोघांची अवस्था, त्यांचे प्राण जातील तर बरें असेंच लोकांस वाटूं लागलें. दशरथाच्या दुसऱ्या ज्या सातशें स्त्रिया त्यांचीही रामावर पुत्रवत् प्रीति होती व रामही कौसल्येप्रमाणें त्यांना मानीत असे. त्याही शोकाक्रांत होऊन गेल्या, कोणी तोंडांत माती टाकूं लागल्या. कोणी भडाभड डोकें फोडून घेऊं लागल्या. दशरथकौसल्येची दुर्दशा तर सांगतां पुरवत नाहीं! त्या दुःखानें कठीण पा-

घाण पण तेही तडातड उकलून गेले. अयोध्येंतील आबालवृद्धलोक कैकेयीस शिव्यांच्या लाखोल्या वाहून पटापट घरेंदारें सोडून रानांत रहाण्याच्या तयारीनें रामाच्या मागोमागच धांवले. तें पाहून रामानें रथ उभा करून सर्वांस सांगितलें कीं, तुह्मी चौदा वर्षें कसा तरी काळ लोटा; वगैरे बहुतप्रकारें बोलून लोकांस माघारें परतविलें. तरी जेवढे ब्राह्मण तेवढे मागें परतलेच नाहींत. ह्मणून रामानें त्या रात्रीं तेथेंच मुक्काम केला.

इकडे राम वनांत जातांच कैकेयीखेरीज सर्व स्त्रिया राजाभोंवतीं जमून राजासह विष भक्षून प्राण देण्याचा त्यांचा विचार ठरला. परंतु वाल्मीकीचा काव्यार्थ सर्वांस कळवून वसिष्ठानें ती गोष्ट कोणासही करूं दिली नाहीं. इकडे रामचंद्रानें मग रात्रीचे वेळीं सर्व ब्राह्मण निर्घोर झोंपीं गेले आहेत असें पाहून तत्काळ रथ जोडून तो बराच अयोध्येकडे चालवून मग आकाशपंथानें शृंगवेरी भागीरथीतीरीं आणवून उतरला. तेथें गुहकनामा किरात श्रीरामाचा परमभक्त रहात होता. रामानें मग प्रातःकाळीं भागीरथीची स्तुति करून सर्वांनीं स्नानें केलीं. वडाचा चीक डोक्यांत घालून केंसांच्या दोघांनींही जटा वळिल्या व भस्म लावून दोघेही शिवदीक्षा घेऊन राहिले. इकडे ब्राह्मण जागे होऊन पाहतात तों रथ नाहीं. मग अयोध्येच्या मार्गानें रथ गेला, याचा तपास करतां अयोध्येकडेच "धांव"गेली असें पाहून मोठ्या आनंदानें ते परत गेले. तों तेथेंही राम नाहीं असें पाहून रामावांचून अयोध्येंत जावयाचें नाहीं असा निश्चय करून तेही निर्जन अशा वनांत जाऊन आश्रम बांधून राहिले.

# अध्याय अकरावा.

## दशरथप्राणत्याग.

समस्त मायाजालाचा त्याग करून योगी जसा निरंजनीं रहातो, त्याचप्रमाणें तो तमालनील रामचंद्र जान्हवीचे तीरीं राहिला. गुहक हा रामभक्त होता व नदींतून नौका चालवून आपला चरितार्थ चालवीत असे. त्यास हाक मारून राम ह्मणाले, आह्मांला पैलतीरास जाणें आहे, तर काय घेशील तें सांग. गुहक ह्मणाला, आपण कोण आहांत? राम ह्मणाले, अयोध्येच्या दशरथराजाचे आह्मी दोघे पुत्र आहोंत. माझें नांव रामचंद्र. इतकें तो बोलत आहे तोंच गुहकाची आई ह्मणाली, अरे नकोरे नको याला नावेंत बसवूं. याचा पाय लागतांच दगडाची बायको झाली आहे, असें ऋषींच्या तोंडून मी ऐकतें. तर नावेची बायको होऊन तुझ्या गळ्यांत पडली ह्मणजे तूं पोसशील तरी कोणाला? लागेल तर ह्याला खांद्यावर घेऊनच नावेंत तूं बैस; पण नावेला पाय लावूं देऊं नको. तें ऐकून गुहक ह्मणाला, स्वामी, तुमच्या चरणांचा अगाध महिमा आहे, तर त्यांची पूजा करावी असा माझा हेतु आहे, असें बोलून त्यानें रामचरणांची पूजा केली. फळेंमुळें आणून रामास भोजन दिलें. रामाचा त्यास सगळाच मजकूर कळला. मग तो ह्मणाला, प्रभो, आपण परत येईपर्यंत मी फळेंमुळें खाऊनच रहाणार, मी मंगलभोग वगैरे कांहीं करणार नाहीं. ह्याप्रमाणें बोलून त्यानें त्रिवर्गास नौकेंत बसविलें. राम मग सुमंतास ह्मणाले, आतां तूं परत जा. सुमंत ह्मणाला, रामा, आतां माझ्याच्यानें परत जाववत नाहीं, मीं असा रिता रथ

घेऊन जातांच दशरथकौसल्या प्राण देतील, तर मी आतां तेथें जाऊन त्यांच्या दुःखाला कारण होत नाहीं. तो त्याचा निग्रह पाहून रामानें त्याच्या डोक्यावर हात ठेवून ह्मटलें, तूं हट्ट करूं नको, तूं माझें ऐकावेंस. तेणेंकरून सुमंत मुकाट्याच राहिला. नंतर श्रीराम पैलतीरास पोंचून त्यानें पदरानें सुमंतास खूण करून जावयास सांगितलें. नंतर रामचंद्र तेथें एक रात्र राहून प्रयागतीर्थ करून भारद्वाजाचे आश्रमीं गेला. तेणेंकरून त्यांस संतोष वाटून त्यांनीं रामाचा योग्य सत्कार केला. नंतर तेथून रामचंद्र सिद्धवटीं आले. तोच सावित्रीचा वट. सीतेनें तेथें असा नवस केला कीं, श्रीराम सुखरूपपणें येथें परत आल्यावर येथें दोन लाख गोदानें करून ब्राह्मणभोजन करीन. नंतर पुढें मार्ग क्रमून चित्रकूटपर्वतावर गेले. तेथेंच वाल्मिकिमुनि राहात होते. त्यांस भेटून रामानें साष्टांग नमस्कार केला. मग तेथेंच कांहीं दिवस राहण्याचा इरादा रामानें दर्शित केल्यावरून लक्ष्मणानें तेथें एक पर्णशाला बांधली. तोंपर्यंत गुहक त्याचे बरोबर होताच, त्यास रामानें परत लावून दिलें. तो सुमंत गुहकाची वाट पहात तेथेंच होता. मग चित्रकूटीं राम राहिले असें ऐकून सुमंत शोकाक्रांत होऊनच परत गेला. तेव्हां त्याला अयोध्या प्रेतवत् दिसूं लागली. तो तोंडावर पदर घालूनच कैकेयीच्या घराजवळ त्यानें रथ सोडला. त्याचें तोंड अगदीं काळें ठिक्कर पडलें. रिता रथ पाहतांच अयोध्येंतील लोकांचा आक्रोश चालू झाला. सुमंतास पाहतांच राजा हंबरडा फोडून ह्मणाला, सुमंता, अरे माझा राम कोठें रे फेंकून दिलास? तूं आतां माझ्या प्राणाला मूळ आलास कायरे, हायहाय! मी आतांच प्राणत्याग करून वायुरूपानें माझ्या बाळाकडे जातों. अरे माझा तो मोतींदाणा कोठें रे झोंकून दिलास? को-

ठें रे माझा तो हिरा पडला? अरे माझा तो राजहंस कोठें रे चिखलांत रोंविलास? अरे माझी अंधाची ती काठी कशी रे नेलीस? हायहाय! हे जानकी! माझी आई तूं कोठें गे आहेस? सुमंता! सांग रे सांग तीं माझीं पाडसें रस्त्यानें कशीं रे चाललीं? त्यांनीं खाल्लें काय, निजले कोठें? सुमंता! सुमंता! बोल रे बोल. सुमंताचीही शोकानें तीच अवस्था उ-झाली. तो ह्मणाला, स्वामी, काय सांगूं? तीन दिवस तर कोणालाच कांहीं खायाला मिळालें नाहीं, खालीं गवत हांतरूनच तीं निजलीं. पांघरायाला आभाळ अशी त्यांची विपत्ति ह्या निर्दयानें पाहिली. शृंगवेरापर्यंत मी त्यांच्याबरोबर होतों, पुढें गुहकानें त्यांस नदी उतरून नेलें. नंतर तीं तेथून पायांनींच पुढें चालतीं झालीं, असे त्याचे शब्द ऐकतांच त्यानें भडाभड ऊर, कपाळ झोडून घेतलें व रामा! रामा! ह्मणतांच त्याचा प्राण निघून गेला. 'पहा कर्मगति कशी ग-हन आहे ती! चौघे पुत्र असून एकही जवळ नाहीं. शेवटीं सुमं-तानें मांडी दिली. त्यावेळीं त्याच्या सर्व स्त्रिया शंख करीतच तेथें आल्या. त्यावेळच्या त्यांच्या शोकाला तर अंतच नाहींसा झाला. कौसल्या ह्मणाली, आतां ह्या राज्याला आग लावा रे लावा. तिनें तर डोकें आपटून रक्तानें सर्व अंग भरून घेतलें. ह्याप्रमाणें जिकडे ति-कडे शोकाचा पर्वकाळ उसळून गेला. शेवटीं वसिष्ठ धैर्य धरून ह्मणाला, सुमंता, तूं आतां शोक सोड, आतांच जाऊन भरतास घे-ऊन ये. त्यास येथें येईपर्यंत कांहींएक सांगूं नको. दुसरा राजा स्थापिल्यावांचून ह्याचा देह दग्ध करतां येत नाहीं. तोंप-र्यंत ह्यास तैलकढयींतच ठेविलें पाहिजे. ह्याप्रमाणें करून मग सुमंत रथ घेऊन चालता झाला. तो नगराजवळ जातो तोंच भरतशत्रुघ्न कांहीं त्यांस दुष्ट स्वप्न पडल्यामुळें ते शोकातुर होऊन अयोध्येसच जाण्यासाठीं

निवाले होते. त्यांना पहातांच सुमंतानें शोकाचा उमाळा दाबून तुह्मांला नेण्यासाठींच आलों ह्मणून सांगितलें. त्याची त्या वेळची वृत्ति पाहून भरत अगदींच घाबरून गेला. त्यानें रामराय खुशाल आहे काय ह्मणून विचारलें. तेव्हां ते खुशाल आहेत असें सांगून त्या दोघांस रथांत घेऊन चालता झाला. वाटेंनें त्यानें डोळ्यांवरचें पांघरूण काढलें नाहीं, व एकही अक्षर बोलला नाहीं. भरताचा तर कंठ शोकानें दाटून गेला; त्याला कांहींच बोलवेना. परंतु नगराजवळ येतांच वाद्यें ऐकूं येईनात. नगर अगदीं उदास झालेलें पाहून तो अगदीं वेडाच झाला. इतक्यांत जेथें राजाचें प्रेत होतें तेथें रथ येऊन पोंचला. तेव्हां बापाची ती अवस्था पाहून त्यानें भयंकर शोक केला, व राम कोठें तो मला आधीं दाखवा असें बोलून राममंदिराकडे जाऊं लागला. तरी रामाबद्दल कोणीच कांहीं बोलेना, कां कीं, जो खरा रामभक्त तो हें ऐकतांच डोकें फोडून प्राणच द्यायचा. असो, तो राममंदिराकडे जात असतां कौसल्या त्यास आडवी झाली. तोंच ‘हे आई, राम कोठें आहे ह्मणून’ भरत ह्मणाला. ती तें ऐकतांच शोकानें खालीं पडली, तरी पुन्हा तोल सांवरून ह्मणाली, बाळा, माझा राम वनांत गेला कींरे! तेणेंकरून राजानें प्राण सोडला. हें ऐकून भरतानें शोकाचा तर कल्पांतच मांडला. व ह्मणाला, धन्य राजा दशरथ कीं राम वनांत जातांच त्यानें प्राण दिला, माझे हे दुष्ट प्राण तरी कां अझून जात नाहींत? तेव्हां वसिष्ठ ह्मणाले, भरता! कां व्यर्थ शोक करतोस? तुला राज्याभिषेक केल्यावांचून राजाचें दहन होत नाहीं. तुझ्या आईचा असाच हेतु होता, यासाठीं रामचंद्र वनीं गेला. तर आतां आनंदानें हें राज्य स्वीकार. ते शब्द भरताला तापल्या तव्याप्रमाणें लागले. व तो

ह्मणाला, मी जर हें राज्य स्वीकारीन तर पृथ्वीवरील सर्व ब्राह्मणांच्या हत्या मला लागोत. पुन्हा जर 'तूं राज्य घे' असें मला कोणी बोलेल तर मी तत्काल उरांत सुरी खोंचून घेईन, रामावांचून जर मी अयोध्येंत राहीन तर मला किडे पडोत. अहो वसिष्ठगुरुजी! तुह्मांस रामाचीच शपथ आहे, मला राज्य द्याल तर कैकेयी ही माझी आई नव्हे, ती लांव आहे. तिचें तोंड काळें पडो, तिला रांडपण आवडलें, तिनें पतीचा घात केला. असें तो ह्मणत असतां वसिष्ठानें त्यास कच्ची हकीगत सांगून ह्मटलें, सर्व दोषांला कारण मंथरा होय; मंथरा तेथें होतीच, भरत तत्काळ तिचेवर शस्त्र घेऊन धांवला; परंतु स्त्रीवध करूं नये असें सांगून वसिष्ठानें त्यास निवारलें. मग वसिष्ठानें रामाच्या पादुका सिंहासनावर ठेवून भरताकडून दशरथाचा सर्व विधि उरकून टाकविला. तेव्हां दशरथाच्या सातशें स्त्रिया सती गेल्या. सुमित्रा, कौसल्याही सती जात होत्या, परंतु पुत्रवतीनें जाऊं नये असें सांगून वसिष्ठानें त्यांस राहविलें. ह्याप्रमाणें तो सारा दिवस दुःखांतच गेला.

रात्रीचे वेळीं कैकेयीनें भरतास एकांतीं भेटून ह्मटलें, भरता, बापाचें भाषण खरें करण्यासाठीं राम वनांत गेला, व त्या शोकानें राजाही मृत झाला, हेंही एक ठीकच झालें. बरें, दिवसभर जे तूं प्रकार केले तेही ठीकच झाले. आतां खुशाल आनंदानें राज्य कर. तें ऐकतांच भरत ह्मणाला, चांडाळिणी, उठ येथून काळें तोंड कर, आग लागो तुझ्या त्या तोंडाला, महादुष्ट तूं. चांडाळिणी, तूं रामास वनांत पाठवून पतीचा प्राण घेतलास; तुला आई ह्मणतांना मला पाप लागेल. तुला आतांच ठार केलें असतें, परंतु काय करूं, रामचंद्र मला दोष देईल. चल नीघ येथून; मी आतांच वनांत रामाकडे जाऊन त्यास आणतों.

नीच येथून कशी. ह्याप्रमाणें बोलत असतां उजाडतांच तोही रामाप्रमाणें वल्कलें नेसून राखेनें अंग माखिता झाला. वडाच्या चिकानें जटा वळल्या व पायांनींच राम गेला त्या मार्गें चालता झाला. त्या वेळीं मागून सर्व लोक व सैन्यही निघालें. शत्रुघ्न, कौसल्या, सुमित्रा, वसिष्ठ, सुमंत वगैरे कैकेयीवांचून सर्व लोक निघाले. तेव्हां जे ते भरताची वाहवा व कैकेयीची निंदा करीत व रामगुणानुवाद गात चालले. मग भरतानें सुमंतास सांगितलें कीं, राम ज्या मार्गानें गेले तोच मार्ग मला तूं दाखव. तें ऐकून सुमंतानें त्या सर्वांस गुहकाश्रमीं आणलें. तें प्रचंड सैन्य पाहून गुहकास वाटलें कीं, कैकेयीच्या मसलतीनें रामास मारण्यासाठीं हें सैन्य घेऊन भरतशत्रुघ्न चालले आहेत, ह्मणून त्यानें आपले लक्षावधि किरात गोळा करून शस्त्रें त्यांस देऊन ह्यांच्यावर धांवला. तेव्हां भरतानें नीट तपास करून तो रामभक्त हें जाणतांच त्याचे गळीं मिठी मारून ह्मटलें, गुहका! नाहीं रे नाहीं, मी रामाचा वैरी नाहीं, मी त्याच्या पायांचा दास आहें. मला त्याचें दर्शन करीव. तो येथें असतां कोठें बसला, निजला कोठें तें मला दाखव. तेव्हां त्याचा खरा भाव जाणून त्याशीं सख्य केलें. ते दोघेही खरेच रामभक्त होते. दोघांनींही वेष सारखा व नियम सारखाच केला होता. असो. मग ह्या येथें तृणशय्येवर राम निजले, येथें बसले वगैरे सर्व सांगून चित्रकूटीं रामाची भेट घडेल तर आतां सर्वांनीं नौकेंत बसावें असें ह्मणून त्या साऱ्या लोकांस गुहकानें नदीपार करून दिलें, व आपण त्यांच्याबरोबर चालला. तेव्हां प्रयागक्षेत्रावरून भारद्वाजाचें दर्शन घेऊन ते चित्रकूटाच्या मार्गास लागले.

त्या वेळीं चित्रकूटींत असा प्रकार घडला कीं, लक्ष्मण फळें आ-

णण्यासाठीं पर्वताखालीं आला होता. रामचंद्र अग्नींत होम देत होते, व सीतामायी त्यांस साहित्य पुरवून सहज पर्णकुटिकेबाहेर आल्या. तोंच सुदर्शननामा गंधर्व सीतेच्या रूपास भुलून कावळ्याचे रूपानें तिच्या स्तनप्रदेशीं चोंचा मारूं लागला. त्याबरोबर तिनें ओरडून हें रामास कळविलें. तेव्हां रामानें दर्भ मंत्रून त्याचे आंगावर टाकला, त्याचा तीव्र बाण बनून तो त्या कावळ्याच्या मागें लागला. त्यापासून सुटावें ह्मणून कावळा सर्व त्रैलोक्यास शरण गेला. परंतु त्याचे क्लेश कमी होईनात, शेवटीं नारदाचे सांगण्यावरून तो रामासच शरण गेला. तेव्हां रामानें त्याचा एक डोळा फोडून बाण आवरून तूं विष्ठा भक्षण करशील असा शाप दिला. मग त्यानें विशेष पायधरणी केल्यावरून एक बुबूळ दोन्ही डोळ्यांत फिरून तुझी दृष्टि तीव्र होईल व पिंडाला तुझा स्पर्श झाल्यांवांचून प्राण्याचा उद्धार होणार नाहीं एवढा त्यास वर दिला.

---

# अध्याय बारावा.

## भरतभेट.

श्रीरामाकडे वरील प्रकार चालू आहे तों इकडे एक मोठाच अनर्थ होण्याची वेळ आली होती; ती अशी कीं, त्या वेळीं लक्ष्मण पर्वताखालीं उतरून फळें गोळा करीत होता, इतक्यांत हें प्रचंड लष्कर इकडून तिकडे जात होतें, त्यावर लक्ष्मणाची नजर आली. त्यानें आपलेयेथील दोन्ही रथ ओळखिले. तेव्हां कैकेयीचे मसलतीनें भरतशत्रुघ्न आह्मांवर येत आहेत अशी गुहकाप्रमाणें त्याची-

ही समजूत झाली. आणि मग त्यानें तत्काल धनुष्य चढवून तीव्र शरवृष्टि चालविली. हें कांहीं भलतेंच विघ्न आपणावर येत आहे असें पाहून शत्रुघ्नही बाण सोडूं लागला. दोघेही रामभक्त व त्यांचे बाणही रामनामांकितच, त्यांनीं आकाशप्रांत भरून गेला. तो भयंकर प्रकार पाहून पर्वतावरील राहणाऱ्या ब्राह्मणांस वाटलें कीं, रामानें विश्वामित्राचा मख रक्षण्यासाठीं वीस कोटी राक्षस मारले. त्याचें वैर काढण्यासाठींच हें प्रचंड राक्षससैन्य येत आहे, आतां आमची धडगति दिसत नाहीं. ह्मणून ते रडतओरडतच रामाच्या पर्णकुटिकेंत आले. तेव्हां रामही धनुष्य चढवून बाहेर पडून ह्मणाला, तुह्मांस येथें काळाचीही भीति नाहीं. मी आतां ह्याचा बंदोबस्त करून येतों असें ह्मणून खालीं उतरून पाहतो तों आपलेंच सैन्य देखून भरत आपले भेटीस येत आहे असें त्यास वाटून त्यानें लक्ष्मणास तसेंच ओरडून सांगितलें. परंतु लक्ष्मण वीरश्रीनें भरून जाऊन तसेच बाण सोडीत होता; शेवटीं रामानें त्याचें धनुष्य ओढून घेऊन त्यास सावध केलें. तोंच रामास पाहून भरत लोटांगणें घालीत धांवला, रामानें त्यास पोटाशीं धरलें, शत्रुघ्नही तसाच धांवला. रामानें बराच वेळ दोघांसही आलिंगन दिलें. सर्व अयोध्येचे ब्राह्मणही रामास भेटले, नंतर सुमंत भेटला, व वसिष्ठ आणि मातोश्री हीं दूर उभीं आहेत तें ऐकतांच रामानें येऊन वसिष्ठास नमन केलें. तोंच कौसल्या व सुमित्रा ह्या दोघी वाहनांतून खालीं उतरल्या. रामानें त्यांस नमन केलें. वडील खुशाल आहेतना? असें विचारिलें, तेव्हां एकच आक्रोश उडाला. रामासही तो प्रकार कळून त्यानें पण शोक आरंभिला. त्याही वेळीं तें सर्व अरण्य शोकातुर होऊन गेलें. मग वसिष्ठानें चालीप्रमाणें समाधान करून रामास प्रयाग-

क्षेत्रीं नेऊन दशरथाचें उत्तरकार्य उरकून घेतलें. नंतर पुन्हा सर्व मंडळी चित्रकूटीं आली. तेव्हां भरत रामाला ह्मणाला, माझ्या आई- च्या भाषणावर आपण लक्ष देऊं नये, आपण आतां अयोध्येस चलून राज्य चालवावें व दशरथाप्रमाणेंच आमचें रक्षण करावें. जर आपण येणार नाहीं तर मी देह ठेवणार नाहीं. राम ह्मणाले, भरता, पितृवचनाचा भंग करील तो पुत्र कशाचा, तस्मात् बापाच्या आज्ञे- प्रमाणें मात्र चवदा वर्षें अरण्यांत राहिलें पाहिजे व तूं राज्य स्वीकारलेंच पाहिजे. मी चौदा वर्षें व चौदा दिवस पूर्ण होऊन पंधरावे दिवशीं दोनप्रहरांपूर्वीं अयोध्येस येईन. ह्यांत मात्र अंतर पडणार नाहीं. असें रामानें जरी सांगितलें, तरी भरत आपला आग्रह सोडीना, तो परमनिश्चयानेंच नदीतटाकीं बसला. तेव्हां वाल्मीकि मु- नीनें रामाच्या सांगण्यावरून भरतास सर्व अवतारभविष्य कळवून त्याचा मोह दूर केला. तरी तो रामास असें ह्मणाला कीं, मी नग- रांत जाणार नाहींच. नंदिग्रामीं मी रहाणार व तेथूनच शत्रुघ्नाकडून राज्यव्यवस्था चालवीन, आपल्या पादुका मला द्याव्यात. मी कंद- मूळें खाऊन सर्व भोग दूर ठेवून व आपल्या पादुका माथीं घेऊन दि- वस लोटणार. आपण सांगितल्या मुदतीची दोनप्रहरची वेळ टळून गेली व आपलें दर्शन न झालें कीं, मी त्याच वेळीं अग्निकाष्ठें भक्षण करीन. तें त्याचें ह्मणणें रामानें मान्य करून त्यास आपल्या रत्नजडित पा- दुका दिल्या. त्या त्याचवेळीं भरतानें मस्तकीं ठेवल्या, त्या रामचंद्र परत येईपर्यंत तशाच होत्या. असो. रामानें मग सुमंत व शत्रुघ्न यांस राज्य चालविण्याबद्दल यथायोग्य बोध केला; आणि नंतर सर्वांस परत लावून दिलें. नंतर भरत नंदिग्रामींच राहिला, व शत्रुघ्न मात्र अयोध्येंत राहून राज्यव्यवस्था पाहूं लागला. तरी वारंवार

त्यानें भरताकडे येत असावें व लोक व सर्व राजे भरतशत्रुघ्नांचा दरारा बाळगून योग्य मार्गानेंच चालत असत.

इकडे हा प्रकार कसा तरी पार पडला. परंतु रामचंद्र चित्रकूटीं असल्यामुळें राक्षसांचें व त्यांचें मूळचें वैर, त्यासाठीं ते एखादे वेळेस धांवून येतील व त्याबरोबर आपल्यास मरावें लागेल, असें तेथील अज्ञानी ब्राह्मणांस वाटून ते रामास ह्मणाले, तूं येथून जा, नाहीं तर आह्मी तरी येथून जातों. कारण राक्षस तुझ्यापायीं येथें येऊन आमचा नाश करतील. राम ह्मणाले, राक्षस आले तर मी तुमचें रक्षण करीन; ब्राह्मण ह्मणाले, तूं आपली बायको संभाळशील कीं आह्मांला संभाळशील? तें ऐकून राम हसूं लागले. शेवटीं ते वेडे ब्राह्मण रात्रीं मुकाट्यानें उठून खटल्यासह चालते झाले. फक्त एक महाराज वाल्मीकिमुनि मात्र राहिला. ठीकच आहे रामासन्निध राहण्यापुरतें पदरीं पुण्य पाहिजे.

---

# अध्याय तेरावा.

## श्रीरामश्रीदत्तात्रेयभेट.

श्रीराम चित्रकूट सोडून पुढें चालले. ते ऋषींचे आश्रम पावन करीत व भक्तांचा उद्धार करीतच चालले. ज्याच्या आश्रमीं ते जात तेथील तापसी त्यांस रहाण्याचा आग्रह करीत. त्यामुळें कोठें एक रात्र, कोठें पांच रात्री, आठवडा, पंधरवडा, महिना, सहा महिने, वर्ष अशा प्रकारें मुक्काम करीत दक्षिणदिशेनें स्वारी चालली

होती. अशा प्रकारें ते जात असतां सह्याद्रिपर्वतावर त्यांची व भगवान् श्रीगुरुदत्तात्रेयांची भेट झाली. अहाहा! धन्य तो दत्तात्रेयांचा अवतार; उदंड अवतार झाले, पण असा कोणचाच नाहीं. हरएक अवतार परमेश्वरानें कोणा तरी दुष्टाच्या नाशार्थच घेतले आहेत, पण हा तसा नाहीं, शिव विष्णु ब्रह्मा ह्या तीनही श्रेष्ठ देवतांचे यांत अंश आहेत, इंद्र, चंद्र, सूर्य आदिकरून सकल देव नित्य त्यांचें त्रिकाल दर्शन घेतात. अद्याप सह्याद्रीवर हा प्रकार चालू आहे. असो, रामचंद्रांनीं त्यांचें दर्शन घेऊन अत्रीचे आश्रमीं गेले. त्याची स्त्री अनुसूया जी दत्तात्रेयाची माता तिलाही रामानें वंदन केलें. तिनें सीतामायीचे कपाळाला आपल्या कपाळाचें कुंकू लाविलें, तिची वेणी घातली, शुद्ध स्वच्छ वस्त्र नेसविलें, पुतळ्यांचे हार गळ्यांत घातले, हे सर्व प्रकार सीतामायी चौदा वर्षांनीं परत येईपर्यंत जशाचे तसेच राहिले. सुकणें, मळणें, विसकटणें, पुसणें हें त्यांस ठाऊक नाहीं. हें त्या अनुसूयेचें मूर्तिमंत पुण्य होय. येणेंकरून सीतेस राक्षसांचें भय नाहींसें झालें. असो. ह्यानंतर रेणुका जी प्रभूची पूर्वजन्मींची माता तिचें दर्शन घेऊन अनेक प्रकारें तिचीं स्तोत्रें गाइलीं. अशा प्रकारें तीन रात्र तेथें राहून पुढें रामचंद्र अत्रीची आज्ञा घेऊन दक्षिणदिशेकडे चालते झाले. पुढें राम, त्यामागून लक्ष्मण, त्यामागून सीता असा त्यांचा चालण्याचा क्रम असे. त्यानें मार्ग चालतांना वेळोवेळ वृक्षछायेंत बसावें. कां कीं सीतेस कष्ट होऊं नयेत.

अशा प्रकारें ते चालत असतां विराध नांवाचा एक प्रचंड राक्षस त्यांना आडवा आला. त्यानें सीतेला उचलूनच नेलें. तेव्हां रामचंद्रानें एकाच बाणेंकरून त्यास मुक्ति दिली. तो तुंबरूच्या शा-

पानें विराध गंधर्व राक्षसत्व पावला होता. रावणही ह्याला वचकून होता असा हा पराक्रमी असे. चण्यांप्रमाणें तो गायीमनुष्य खात असे. त्यानें रामाची मग स्तुति करून शरभंग आपली वाट पहात आहे असें सांगून तो चालता झाला. ह्या वेळापासून सीता दोघांच्या मधून चालत असे व तेही धनुष्यावर बाण ठेवूनच चालत असत. अशा प्रकारें शरभंगऋषीचे आश्रमीं गेले. त्या ऋषीस गलितकुष्ठ असे. तरी तो दिव्यदेह धारण करून रामास भेटला. रामानें त्याचें दुःख दूर केलें. त्यास उष्णोदकाचें स्नान मिळत नसे. ह्मणून प्रभूनें तेथें एक उष्णोदकाची बावडीच करून दिली. अशा प्रकारें शरभंगाचा उद्धार होऊन तो इंद्रलोकीं गेला.

ह्यावर प्रभूनें सुतीक्ष्णऋषीची भेट घेतली. तेथें तीन रात्री राहून पुढें पांचाळेश्वरावरून स्वारी चालली. वाटेनें जातांना कैक ऋषींचा त्यानें उद्धार केला. ऋषींची तपश्चर्या तरी अचाटच! कोणी झाडाला उलटे टांगून राहिले आहेत, कोणीं हातच वर उभारले, कोणीं कांहीं, कोणीं कांहीं, अशा प्रकारें तपाचरण करणारे बहुतेक रामानें उद्धारून लाविले. पुढें मार्ग चालत असतां जमिनींतून त्यांचे कानीं वाद्यगायनध्वनि आला. तेथें मंदकर्ण नांवाचा तापसी असे. त्याचेजवळ अप्सरा सदा गायन करीत असत. त्यानें ज्ञानदृष्टीनें भगवान् आले असें जाणून वर येऊन त्यांचें दर्शन घेऊन आपल्या तपाचें सार्थक केलें. ह्यानंतर अगस्तीचे दर्शनाविषयीं उत्सुक होऊन प्रभु त्याचे आश्रमाकडे निघाले. अगस्ति हा ऋषी मोठा समर्थ, त्याला शाप देण्यासही समर्थ असा, व योद्धाही मोठा निपुण होता. डोक्यावर जटा व खांद्यावर धनुष्यभाता तो बाळगी. त्याची स्त्री लोपामुद्रा ही महापतिव्रता होती. अगस्तीनें तपसाम-

ष्यीनें एकदां तर समुद्राचा एकच घोंट करून टाकला. त्याचें कारण असें कीं, आतापि, वातापि व इल्वल असे तीन मोठे कपटी राक्षस असत. त्यांतून एकानें उदकरूप एकानें फळें, मूळें, अन्न वगैरेचें रूप धरावें. नंतर एकानें दाता होऊन एखादा ब्राह्मण गांठून त्यास तीं फळें, उदक देऊन त्याची तृप्ति करावी व मग त्याच दात्यानें 'यारे मित्रांनो'; असें ह्मणतांच त्या बिचाऱ्याचें पोट फोडून दुसऱ्या दोघांनीं बाहेर यावें आणि मग खुशालपणें तें प्रेत खाऊन दुसऱ्या शिकारीचा शोध करावा. ही पाळी एकदां अगस्तीवरही आली. पण तो काय तो प्रतिपरमात्मा; त्यानें फळें खाऊन तो फळरूप राक्षस पोटांतच थंड केला, व दात्यास तर एकाच बाणानें ठार केलें. पण इल्वल हा पटकन् सुटून समुद्राच्या उदकांत जलमय होऊन राहिला. तरी त्याचें मरण चुकलें नाहीं, अगस्तीनें सारा समुद्रच गट्ट करून त्याही राक्षसाचा फडशा उडविला. हें सुतीक्ष्ण ऋषीकडून रामास कळतांच मोठ्या आतुरतेनें अगस्तीच्या आश्रमीं गेला. अगस्तीनेंही त्याचा फारच नामी सत्कार केला. धन्य तो आश्रम, तेथें वृक्षांची दाट रायी असून फलपुष्पांनीं ते वृक्ष सदा पूर्ण असत. जनावरें स्वभाववैर सोडून तेथें वागत. पक्षीही वेदचर्चा करीत. अगस्तीनें रामाला उत्तम प्रकारचीं शस्त्रेंअस्त्रें दिलीं व एक अभेद्य कवच दिलें. रावणाचा प्राण घेईल असा एक बाण दिला. शिवाय आणखीही दिव्य बाण दिले. ऋषीपत्न्यांनीं तिकडे सीतामायीचाही चांगल्या प्रकारें सत्कार केला. रामचंद्र तेथें एक महिनाभर राहिले. नंतर मग अगस्तीच्या विचारें पंचवटींत रहाण्याचें ठरवून त्याच मार्गाला त्रिवर्ग चालतीं झालीं. तों वाटेंत जटायूची गांठ पडली. तो अरुणाचा पुत्र, दशरथाचा व त्याचा बंधूप्रमाणें

स्नेह असे. त्यानें ह्यांचा शोध करून आपलाही प्रकार कळविला त्यावरून रामचंद्र त्यास चुलत्याप्रमाणें मानूं लागले. तो सातआठ वर्षें रामाच्या आश्रयाला होता. महाप्रतापी तो पुरुष. असो मग श्रीरामचंद्रानें पंचवटींतच वसाहत केली. लक्ष्मणानें तेथें गोदातीरीं एक खूप मोठी अशी पर्णशाळा तयार केली. त्यानें प्रभूस नित्य फळें-मूळें आणून द्यावीं व रात्रौ त्याच्या पर्णकुटिकेजवळ खडा पहारा करावा. निद्रा आणि फलाहार अशीं त्याला बारा वर्षांत नाहींतच. अशा प्रकारें त्यानें रामचंद्राची सेवा केली. सीतामायीचे चरण मात्र त्याच्या पूर्ण माहितीचे, परंतु इतर भाग ओळखींत राहण्यासारखा त्यानें कधींच पाहिला नव्हता. असो तो खरा माहात्मा पुरुष होता. धन्य त्याची!

श्रीराम पंचवटींत राहिले ही गोष्ट लागलीच तेथें चोहींकडे कळली. तेव्हां कैक ऋषीही तेथें जवळ जवळ वस्ती करून असत. त्या प्रांतीं भिल्लांची वस्ती मोठी, व अझूनही ते लोक थोडे फार तेथें आहेतच. त्या भिल्लांच्या स्त्रियांची रामावर मोठी भक्ति असे. व त्या नित्य रामदर्शनास येऊन अनेक उत्तम उत्तम फळें आणून देत असत. रामही मोठ्या प्रेमानें तींच भक्षण करी. ह्यावरून तीं त्या भिल्लिणींचीं भक्तिरूपच फळें होत. त्यांनीं रामाकडे येऊन चमत्कारिक गाणीं गावींत, नाचावें. अशाप्रकारें रामचंद्र तेथें रावणाच्या आयुष्याची वाट पहात काल कंठीत राहिले.

# अध्याय चौदावा.



## शूर्पणखाविटंबना, खरदूषणत्रिशिरवध.

लक्ष्मण एकवेळ अरण्यांत हिंडत असतां आकाशांतून एक कालखड्ग त्याचे पुढें पडलें. तें पाहून त्यास परम आश्चर्य वाटलें. नंतर याची तीव्रता पाहाण्यासाठीं तेथें एक वंशवेळूंची दाट रायी होती तीवर तें त्यानें फेंकलें. त्यामुळें वेळू तर सर्व छेदून पडलेच, पण त्यांतून एक रक्ताचा ओहोळही बाहेर आला. तो कशाचा ह्मणून लक्ष्मण जों पहात आहे तों एक ऋषि तेथें छेदून पडला असें पाहून आपलेकडून ब्रह्महत्या झाली अशाबद्दल खेद मानीतच त्यानें रामाकडे येऊन हें वर्तमान सांगितलें. तेव्हां भगवंतानें ज्ञानदृष्टीनें पाहून ह्मटलें कीं, तूं शोक करूं नको. तुझे हातून ब्रह्महत्या झाली नाहीं तर, तो शूर्पणखेचा पुत्र, रावणाचा भाचा, शंबरीनामें होता. तो ह्या काळखड्गनिमित्त तप करीत होता. तों त्याचें कुंडें याच्याच पुढें. तें ऐकून लक्ष्मणास संतोष झाला. पण मग आतां लवकर राक्षसांशीं प्रसंग घडेल असें त्यास वाटूं लागलें, आणि तो प्रसंग लागलाच आलाही. ह्मणजे असें झालें कीं, ज्या दिवशीं शंबरी प्राणास मुकला त्याच रात्रीं त्याची आई जी शूर्पणखा तिला वाईटसाईट स्वप्नें पडून ती त्याच वेळीं पोराच्या शोधासाठीं धांवली, तों पोराच्या प्रेतावर गिधाडें बसलीं आहेत हें पाहतांच तिनें आक्रोश मांडला. तिचे बरोबर चौघी राक्षसी होत्या, त्यांनीं तिला मोठ्या प्रयत्नानें समजाविलें. मग ती चौकशी करते तों तेथें मनुष्यांचीं पावलें तिला दिसलीं. तेव्हां मनुष्यानें जर हा पुत्र मारला तर

राक्षसांचा अवतार संपला असेंच तिला वाटलें. नंतर कोण मनुष्य ह्याचा तपास करतां लक्ष्मण फळें शोधीत असतां तिचे दृष्टीस पडला. तेव्हां हाच तो दुष्ट असें समजून त्याचें रक्त पिण्याची हांव धरून ती सुंदर कोमल रूप धरून लक्ष्मणाकडे येऊन ह्मणाली, मी आपले रूपास पाहून भुललें, तर आपण माझा स्वीकार करावा. तो ह्मणाला, माझा वडील बंधु रामचंद्र तो तेथें पर्णशाळेंत आहे त्याची आज्ञा घेऊन ये. तें ऐकून ती रामाकडे येऊन तिनें आपला तो ठक हेतु रामास सांगितला. मग रामानें तिचे पाठीवर असें लिहून दिलें कीं हिचे नाककान निकालास लाव; ही रावणाची बहीण आहे. नंतर ती लक्ष्मणाकडे येतांच लक्ष्मणानें तिचा रामाज्ञेप्रमाणें गौरव केला. तेव्हां ती प्रचंडरूप धरून तेथून जवळ त्रिशिरादि राक्षस होते त्यांचेकडे गेली व त्यांस हें वर्तमान सांगून चौदा हजार राक्षसांसह रामावर आली. मग रामचंद्रानें लक्ष्मणास सीतेचें रक्षण करावयास सांगून आपण युद्धास पुढें सरला. त्या वेळीं त्यानें हांहां ह्मणतां खर-दूषण त्रिशिरादि ते चौदा हजारही राक्षस ठार करून टाकले. तो त्याचा पराक्रम पाहून सीतेस परम आश्चर्य वाटलें. असो, मग ती नकटी शूर्पणखा नाकावाटे रक्त गाळीत शंख करीत लंकेंत गेली. व रावणास तिनें हा सगळा प्रकार सांगून खूप चिडविलें.

# अरण्यकांडप्रारंभ.

## अध्याय पंधरावा.



### श्रीसीताहरण.

शूर्पणखेनें रावणास फारच चिडविलें, तेव्हां रामस्त्री जानकी ही हरण करावी, असा विचार करून रावण प्रथमतः मारीचाकडे गेला. तो रावणाचा मामा, मोठा मायावी असे. त्यास रावण ह्मणाला, मामा! तूं सुवर्णमृगाचें रूप घेऊन आश्रमांतून रामलक्ष्मणांस दूर काढून ने, ह्मणजे मी सीतेला उचलून आणीन. मारीचास रामाचा पराक्रम ठाऊक होता. तो ह्मणाला, रावणा! तूं ह्या गोष्टींत मुळींच पडूं नको, रामाच्या बाणाच्या पिसाऱ्याच्या वाऱ्यानें मी समुद्रांत येऊन कोसळलों. तुलाही रामाचा पराक्रम ठाऊक आहे, तूं धनुष्याखालीं चिरडून मरत होतास, तेव्हां रामानेंच तुझा प्राण वांचविला. आपल्या प्राणदात्याचा तूं असा का उपकार फेडण्यास तयार झालास? पण ह्याचा परिणामही धड होणार नाहीं. फुकट मरून एवढ्या सुखवैभवास मुकशील. तें ऐकतांच रावणानें त्यावर तरवार उगारून ह्मटलें, तुला ऐकायचें कीं मरायचें बोल. मग मारीचानें विचार केला कीं, ह्या दुष्टाच्या हातून मरण्यापेक्षां त्या भगवंताच्याच हातून मरावें हें बरें. अशा विचारानें तो चित्रविचित्र आकृतींनीं युक्त असा सुवर्णहरीण बनून सीतेच्या दृष्टीपुढें येऊन चरूं लागला. तो सीतेच्या दृष्टीस पडतांच ती रामाला ह्मणाली, ह्या हरिणाचें कातडें किती तरी मजेदार दिसतें, तें मला द्या ह्मणजे मी

त्याची कंचुकी अंगांत घालून घरीं जाईन, आतां काय सारे सहा सात महिने उरले चौदा वर्षांला. असें बोलून तिनें रामाचे हातीं धनुष्यबाण देऊन त्यास उटजांतून बाहेर ढकललेंच. बायकांची पुरुषावर सत्ताच अशी कांहीं चमत्कारिक असते. असो, मग लक्ष्मणास राखण ठेवून राम त्या हरिणामागें धांवले. तों हरिणानें त्यास खूप लांब ओढीत नेलें. रामानें संधान पाहून चटकन् त्याच्या वर्मावर बाण मारला. तो काय रामबाणच. तो त्याच्या जिव्हारीं लागला, त्याबरोबर 'हे सीते ! हे लक्ष्मणा' ! धांव, असे रामध्वनिवत् शब्द उच्चारून तो पूर्वींचें विशालरूप धरून प्रेतवत् होऊन पडला. असें तें राक्षसाचें विलक्षण कपट पाहून राम आश्चर्यानें चकित होऊन विश्रांतीस्तव एका अश्वत्थवृक्षाखालीं बसले.

इकडे ते राक्षसाचे कपटशब्द ऐकून लक्ष्मण धांवला नाहीं हें पाहून सीता डोळे वटारून लक्ष्मणास ह्मणाली, रे निर्दया, अझून तूं येथें उभाच. तूं स्वामींचा शोकशब्द ऐकला नाहींस काय? असो. मी समजलें रे तुमचें कपट, एकानें आह्मांस रानांत हांकून दिलें. आतां तूंही रानांत जो आलास तो तुझा हेतु मी समजलें; कीं, रामाचा असा घात व्हावा, आणि मग मी आयतीच तुझ्या हातीं सांपडावी. पण मी तशांतली बायको नाहींच. मी असा कांहीं विपरीत परिणाम झाला असला तर तटकन् प्राण देईन. तें तिचें भाषण त्या जितेंद्रिय रामभक्तास तापलेल्या तव्याप्रमाणेंच लागलें. तरी तो ह्मणाला, मातोश्रि ! आपण काय बोलतां? असो. पण राम हा परब्रह्म आहे. एकवेळ सूर्य थंड होईल, चंद्र उष्ण होईल, मुंगी पर्वत उचलील, पण रामचंद्राचा पराभव कधीं होणार नाहीं, असें जरी तो बोलला तरी ती पुन्हां त्यास तसेंच बोलली. तेव्हां

त्यानें तिच्या भोंवतीं एक रेषा ओढून ह्मटलें कीं, जर ह्या रेषेच्या बाहेर गेलीस तर दुःखांत पडशील, जातों मी आतां. असें बोलून तो अश्रू ढाळीतच तेथून निघून गेला. तो रामाचे दृष्टीस पडतांच ते घाबरून ह्मणाले, रे हें काय तूं तिला एकटी टाकून आलास कसा! डोळे कां तुझे पाण्यानें भरले? तें ऐकून लक्ष्मणानें त्यांचे कानीं कचें वर्तमान घालून ह्मटलें कीं, आतां आपण माझा शिरश्छेद करावा. तेव्हां प्रभूनें त्याचें नीट शांतवन करून ह्मटलें, लक्ष्मणा! मला आतां सीतेची धडगत दिसत नाहीं. मला अपशकून पण व्हायला लागले तर चल लवकर, पाय पण माझे जड झाले. अशा प्रकारें ते आश्रमाकडे येऊं लागले, पण सीता त्यांस भेटली नाहीं. तों असा प्रकार झाला होता कीं, लक्ष्मण दृष्टीआड होण्याचा उशीर तोंच रावण भिक्षुकवेषानें काखेंत झोळी घेऊन तेथें आला. सीतेला हरिणचर्माची कंचुकी प्राप्त व्हावी अशी जी दुष्ट वासना झाली तीच तिच्या दुःखाला कारण झाली. तेव्हांच सीतेची इच्छाही रावणास झोळी घेण्याला कारण झाली. असा तो दुष्ट आश्रमाजवळ येऊन सीतेजवळ भीक मागूं लागला. व शेवटीं त्या रेषेच्या बाहेर तिला आणण्यासाठीं तेथेंच आपले हातपाय आपटून माझ्या तोंडांत एखादें फळ तरी घाल असें ह्मणून तो ओरडूं लागला. तेव्हां तापसहत्या घडेल ह्या भीतीनें सीता एक फळ घेऊन त्याच्या तोंडांत घालण्यास पुढें सरली. तों तिचा हात रावणानें ओढून तिला बाहेर घेतलं आणि मग तो काळ आपलें रूप प्रकट करून तिला रथांत घालून चालता झाला. तेव्हां सीतेला हरिणचर्माची कंचुकी कशी असते तें कळलें. रावणानें तिला धरतांच ती ओरडून ह्मणाली, अरेरे पाप्या! ह्या कर्मानें तुझी राख होईल बरें. असें ह्मणून ती हे रघुवरा! धांवा हो धांवा!

असें ओरडूं लागली. तो तिचा शोकशब्द ऐकून आसपासचे ब्राह्मण आपल्या झोंपडींतून बाहेर डोकावतात तोंच रावण त्यांच्या दृष्टीस पडल्यामुळें ते तसेच जीव घेऊन रानोमाळ पळत सुटले. इकडे सीतेच्या हांका चालूच होत्या. तिला वाटलें, लक्ष्मणास मी जें बोललें तेणेंकरून आतां रामचंद्रास माझा चांगलाच राग आला असेल. व आतां माझी खास ह्या दुष्टाच्या हातून सुटका होत नाहीं. येणेंकरून तिनें एकसारखा आक्रोश चालविला. ते तिचे विलापशब्द जटायूचे कानीं गेले. त्यावरून रामस्त्रीस कोणी रथांत घालून पळवून नेत आहे असें जाणून चटकन् झडप घालून त्यानें चोंचीनें आधीं तो रावणाचा रथ मोडून टाकला. व मग रावणास गांठून ह्मणाला, रे! चोरट्या! आतां तूं येथून जीवंत जाशील काय? असें बोलून त्यानें रावणास अगदीं जर्जर केलें. रावण एवढा पराक्रमी ह्मणविणारा पण त्याचें व्यर्थ सामर्थ्य. तो अगदींच थकला, मग लटकेंच आपलें मरण पायाचा आंगठा फोडण्यांत आहे असें सांगून रामाची शपथ घालून जटायूस त्याचें मरण विचारिलें. तेव्हां पंख हेंच आमचें जीवन असें त्या रामभक्तानें सांगितलें. नंतर पुन्हा दोघांचा झगडा चालून रावणानें पटापट त्याचे दोन्ही पंख उपटून टाकले. त्याबरोबर बिचारा तो लीन होऊन खालीं पडला. घेवढा त्याचा पर्वताकार देह पण मग तो काय कामाचा? त्याच्या अंगाला सहस्त्रशः रक्ताच्या धारा चालल्या. जणूं एखाद्या प्रचंड पर्वतांतून ते रक्तनद्यांचे सहस्त्रशः प्रवाहच वाहतात असा तो भासूं लागला. ह्याप्रमाणें त्याचा प्रकार होतांच रावण मग सीतेला खांद्यावर घेऊन आकाशमार्गानेंच लंकेकडे चालला. सीतेस ह्या वेळीं आपल्याबद्दल, जटायूबद्दल व आपली भेट न झाल्यानें रामाबद्दल असे तीन

शोक उत्पन्न झाले व ती मग रडतच चालली होती. अशा शोकांतही तिनें दोनचार डागिने अंगावरून काढून लुगड्याची एक चिंधी फाडून त्यांत ते डागिने गुंडाळून खालीं टाकले. ते नेमकेच मातंगपर्वतावर सुग्रीव, नळ, नील, जांबुवंत हनुमान् हे बसले होते, त्यांचे जवळ येऊन पडले. सीतेचा शोक ऐकून कोणी दुष्ट कोणाची बायको चोरून नेतो असें जाणून त्यास धरण्यासाठीं मारुतीनें वर उडी मारली. पण वेगासरसा तो फारच उंच गेला. त्यामुळें हा चोर चटकन् पुढें निघून लंकेंत गेला. आणि मग आधीं अठरा राक्षसांस रामलक्ष्मणांचा वध करण्यास पाठविलें. नंतर तो सीतेस आपलें वैभव दाखवून तिला वश करूं लागला. पण ती त्या मुर्दाडाकडे नुसती पाहीना देखील. मग त्यानें तिला अशोकवनांत ठेवून राक्षसींकडून वश होण्याचा उपाय चालू केला. शिवाय पांच कोटी राक्षस तेथें राखण ठेविले होते. त्यांमध्यें सरमा ही बिभीषणाची बायको, त्रिजटा ही बिभीषणाची कन्या ह्याही सीतेजवळ ठेवल्या. परंतु त्या उत्तम कुलांतल्या असल्यामुळेंच सीतेचा तेथें निभाव लागला. नाहीं तर दुष्ट राक्षसिणींनीं तिला बहुत जाच केला असता. असो, रावण तर सीतेच्या योगानें अगदींच वेडा बनला. कामेंकरून तो अगदीं संतप्त होऊन गेला. ब्रह्मदेव, बृहस्पति इत्यादि त्याचे सभासद होते. त्यांच्यावरही तो तोंड सोडूं लागला. इकडे त्या दुष्ट राक्षसिणींनीं सीतेपुढें तर त्काहूर मांडलें. काय त्यांचीं धिप्पाड शरीरें, रूपें तरी किती विचित्र, बोलणें तरी किती कोमल आणि गोड. एक ह्मणे चला हिला खाऊन टाकूं, एक ह्मणे हिच्या सगळ्या अंगाच्या शिरा तोडा, कोणी ह्मणत हिची कातडीं सोला; अशा त्या कोणी श्वानमुखी, सूकरमुखी, खरमुखी, कोणाला एक, कोणाला दोन

तीन असे पाय, हात, स्तनें अशीं त्यांचीं रूपें. अंगाला तर कोण. घाण! कीं, मनुष्याचा त्या गंधानेंच प्राण जाईल. असा सीतेच्या भोंवतीं राक्षसिणींचा पाळा रात्रंदिवस पडून असे. तरी सरमा व त्रिजटा त्या दुष्ट राक्षसींस दाबून दूर करून सीतेचें नानाप्रकारें करून समाधान करीत होत्या.

---

## अध्याय सोळावा.

### श्रीराम सीतेसाठीं शोक करितात.

इकडे लक्ष्मण व राम मार्गानें चालले असतां राम ह्मणत, लक्ष्मणा! आतां सीता माझ्या दृष्टीस पडेल असें मला वाटत नाहीं. ती खचित दुष्ट राक्षसांच्या भक्ष्यस्थानीं पडली असेल. हाय! हाय! हे जानकि! हे विदेहराजतनये! अशा प्रकारें रामचंद्र शोक करीत आहेत व लक्ष्मण त्यांस धीर देत देत आश्रमाजवळ येतात तों आश्रम शून्य! हें पाहून राम अगदींच वेडे झाले. तेथें कोणास विचारावें तर ब्राह्मणही कोणी तेथें उरला नव्हता. तेणेंकरून तर रामास पक्कें वाटलें कीं, सीतेचा घात झालाच. मग मात्र राम अगदीं वेडा होऊन सैरावैरा रानोमाळ धांवत सुटला. वृक्ष, पाषाण, पशु, पक्षी ह्यांनाही तो सीतेचा शोध विचारीत चालला. व त्यांपासून उत्तर मिळे ना ह्मणून त्यांच्यावरच स्वारी रागावूं लागली. तेव्हां लक्ष्मण ह्मणाला, प्रभो! असें काय करतां, सीतेचा शोध, हे काय सांगणार? इतक्यांत रामचंद्र त्याचेवरही रागावून ह्मणाले, रे! कोण तूं बोलतोस, काय तुझें नांव? लक्ष्मण ह्मणाला, मी श्रीरामाचा बंधु.

राम ह्मणाले, कोणचा तो श्रीराम? लक्ष्मण ह्मणाला, जनकाचे घरीं शिवधनुष्य मोडून जानकीस वरणारा. राम ह्मणाला, हाय हाय! सुकुमारे जानकी! कोठें गे तूं आहेस? दाखव रे दाखव लक्ष्मणा, ती जानकी कोठें ती मला दाखीव, तिचेवांचून माझे प्राण जाऊं पाहतात. ह्याप्रकारें शोक करीत व रावणाच्या भयानें ऋषिजन वृक्षपाषाणरूप धरून जे बसले होते त्यांस सीता सीता असें ह्मणून आलिंगन देऊन त्यांचा उद्धार करीत अगस्तीचे आश्रमीं गेला. परंतु सीतेवांचून आतां राम एकटाच येथें आला असें जाणून अगस्तीनें त्यास दर्शन न देतां तसेंच माघारें लावलें. नंतर ते दोघे आपल्या आश्रमाच्या दक्षिणबाजूकडे येऊन पाहतात तों तेथें खूप मोठीं अशीं राक्षसाचीं पावलें व सीतेचे कांहीं अलंकार पाहून कोणी तरी दुष्टानें सीतेस ह्याच मार्गानें नेलें असें मानून शोध करीत चालले. तों पर्वतप्राय जटायूचें शरीर त्यांच्या दृष्टीस पडलें. तेव्हां हाच कोणी राक्षस सीतेस खाऊन येथें बसला आहे असें मानून रामानें क्रोधानें त्यावर बाण धरला. इतक्यांत त्याच्या तोंडांतून रामराम अशीं अक्षरें निघत असलेलीं रामाचे कानीं येऊन तो जवळ जाऊन जटायूस ओळखून फारच कष्टी झाला. मग त्याचें मस्तक मांडीवर घेऊन रामानें त्यास सावध केलें. तेव्हां जटायूनें कच्चें वर्तमान सांगून तेथेंच देह सोडला. काय त्याचें भाग्य पहा! मग रामचंद्रानें पुत्रवत् होऊन त्याची व्यवस्था लावून पुन्हा सीता सीता ह्मणत मार्ग धरला. राम दक्षिण दिशेनें जात असतां जेथें जेथें त्यांचा मुक्काम होई तेथें तेथें ते एकेक शिवलिंगाची स्थापना करीत असत. अशा प्रकारें सीतेच्या निमित्तानें वृक्षपाषाणरूप ऋषींचा उद्धार करीत स्वारी चालली असतां असा एक चमत्कार

झाला कीं, शिवपार्वती त्याचवेळीं आकाशांतून कोठें गमन करीत असतां रामाचा हा प्रकार पाहून पार्वती शंकरास ह्मणाली, काय हो, तुह्मी ज्याचें नामस्मरण करतां तो हाच का राम बायकोसाठीं वेडा होऊन हिंडत आहे? शिव ह्मणाले, होय, हाच तो माझ्या मनास आनंद देणारा भगवान् रामचंद्र. पार्वती ह्मणाली, ह्याला भगवान् कोणीं ह्मणावें, मी तर आतां ह्याला ठकवून येतें. शंकर ह्मणाला, जा तर मग, असें झालें तर मग कोण उगीच ह्याचें नांव घेतो. तें ऐकून पार्वती सीतारूप घेऊन रामापुढें येऊन ह्मणाली, हं आतां शोक सोडून द्या ही मी येथें उभी आहें. असें एक दोन वेळ ह्मणाली तरी, रामानें तिच्याकडे लक्ष न देतां सीता सीता ह्मणत वृक्षपाषाणांस आलिंगन देण्याचा क्रम सोडला नाहीं. शेवटीं लक्ष्मण ह्मणाला, रामचंद्रा! अहो ही सीता आली, आतां कां शोक करितां? हिला आलिंगन द्या. तेव्हां राम ह्मणाले, बा! ती सीता नाहीं ती देवी पार्वती आहे. तें ऐकतांच पार्वती खजिल होऊन राम परब्रह्म आहे असें मानून पटकन् आपलें रूप प्रगट करती झाली. तेव्हां रामचंद्रानें तिला नमस्कार करून तिची बहुत स्तुति केली. नंतर तिच्या प्रश्नावरून ज्या वृक्षपाषाणांस आलिंगन देत होते ते वृक्षपाषाण नसून त्या रूपानें तप करीत बसलेले ऋषि आहेत हेंही रामचंद्रानें पार्वतीस प्रत्यक्ष दाखविलें. मग तर रामचंद्र खराच ईश्वर आहे असें मानून तिनें त्वरित यशस्वी होण्याचा रामचंद्रास वर दिला. तेथें ज्या स्थळीं ती महासती पार्वती बसली होती तेथेंच तिनें अंशेंकरून आपली एक मूर्ति स्थापन केली. तीच आपली कुलस्वामिनी तुळजापुरवासिनी अंबा होय. असो.

रामचंद्र तेथून पुढें कृष्णातटाकीं गेले, व तेथें स्नान करीत

असतां जलरूप होऊन गेले. हें लक्ष्मणाच्या ध्यानांत न येतां कृष्णेनें रामास आपले ठायींच दडपलें असें मानून लक्ष्मण बाण सोडून तिचा नाश करण्यास सिद्ध झाला. इतक्यांत रामचंद्र त्यास भेटले. नंतर तेथून ते पुढें चालले असतां कबंधराक्षसाच्या कवेंत सांपडले. रावणानें जे अठरा राक्षस पाठविले होते, तेही असेच कबंधाच्या कवेंत सांपडून त्याच्या भक्षस्थानीं पडले होते. हा प्रकार रामाचे ध्यानांत येतांच त्यानें त्या राक्षसास मुक्ति दिली. तेव्हां तो दिव्य देह घेऊन रामचंद्रास नमस्कार करून ह्मणाला, हे देवा! मी कश्यपापासून दनूचेठायीं निर्माण झालों. एके वेळीं मी अरण्यांत हिंडत असतां स्थूलशिरानामक ऋषि ध्यान करीत असतां मीं त्यास आरोळी मारून भेडसावलें. तेव्हां त्यानें क्रोधानें मला कबंधराक्षस होऊन पडशील असा शाप दिला. मग मीं त्याची विनंति केल्यावरून श्रीराम सीताशोधास जातांना तुझा उद्धार होईल असें त्यानें मला ह्मटलें. नंतर मी राक्षस झाल्यावर इंद्रपद घेण्यासाठीं झटत असतां इंद्रानें वज्र मारून माझें मस्तक पोटांत घातलें. मग मी असे हे बारा योजनें हात पसरून बसलों. कोणी ह्या कवेंत येतांच मी त्यास धरून खात असें. आज आपण मला ह्या विपत्तींतून मुक्त केलेंत ह्याबद्दल मी आपले बहुत उपकार मानितों. असो. रामचंद्रा! तूं आतां सुग्रीववानराची मैत्री कर ह्मणजे तुझा हेतु साधेल, इतकें बोलून तो विमानांत बसून उद्धरून गेला. नंतर रामचंद्र शबरीच्या आश्रमीं जाऊन पोंचला. ती रामाची मोठीच भक्ति करीत असे. तेथें तिनें भगवंतास उत्तमप्रकारचीं फळें देऊन त्याची पूजा केली. रामचंद्रानें मग तीन रात्री तेथें काढून तिचा उद्धार केला. लक्ष्मणासही ह्याप्रसंगीं रामचंद्रानें दिव्यज्ञान

सांगितलें, नंतर तेथून निघून रामचंद्र हंपीविरूपाक्षक्षेत्रीं येऊन पोंचले. तें स्थळ फारच रम्य होतें; जिकडे तिकडे सुंदर वृक्षलतांची गर्दी असे, गगनचुंबित वृक्षांचीही दाट राई असे. पंपा नामें तेथें एक विस्तीर्ण सरोवर होतें, तेथें निकटच श्रीशंकराचें भव्य देवालय होतें. जिकडे तिकडे स्फटिकांच्या प्रचंड शिळा पडल्या होत्या असें तें रम्य स्थळ स्त्रीविरहज्वरित रामाच्या मात्र कामाचें नव्हतें. असो. त्या रम्यस्थळीं श्रीराम एका गर्द वटवृक्षाच्या छायेंत एका स्फटिकशिळेवर लक्ष्मणाच्या अंकावर मस्तक ठेवून क्षणमात्र निजले. तेव्हां तो शेषशयनाचाच देखावा हुबेहुब दिसला, व तो तसा होताच. रामास प्रथमारंभीं तें स्थळ उत्तम वाटलें खरें. परंतु त्याच्या रम्यतेचा विपरीत परिणाम त्या कामज्वरित रामावर तत्कालच होऊं लागला. व तो हे सीते! हे त्रैलोक्यसुंदरि ! हे गुणमंदिरे! तूं कोठें गे आहेस! तूं मला आतां कधीं गे भेटशील! ह्याप्रमाणें बोलून दीर्घ व उष्ण श्वास टाकून विरहज्वरानें परिव्याप्त होऊन उगाच इतस्ततः नेत्रसंचार करूं लागला. तेव्हां तर त्याचें दुःख अधिकच वाढलें. अशा अवस्थेंत दुसऱ्याचा सुखविलास पाहून तर कामज्वरितास अत्यंतच कष्ट होतात. तोच प्रकार येथेंही झाला. तेथील पशुपक्षी त्यावेळीं मोठ्या आनंदानें आपापली करमणूक करीत होते. कोकिळा सुंदर गायन करीत होत्या. तेव्हां कोपानें श्रीरामानें त्यांस ह्मटलें कीं, दुष्टांनो तुमची वाणी बंद पडो. नंतर त्या शरण आल्यावरून वसंतकालींच तुमची वाणी मुक्त होईल. ठीकच आहे. नवमेघश्याम रामास कामानें तृप्त केलें असतां त्याच्या देखत दुष्टांनीं अशा चेष्टा कराव्यात काय? असो, मृगमृंगी क्रीडा करीत असतां त्यांस शाप दिला कीं, तुह्मांस रात्रीं पारधी धरतील, करि-

करिणींस विहरतांना पाहून शाप दिला कीं, उदकावांचून इतरत्र तुह्मीं क्रीडा केली तर हत्ती सात दिवस मूर्छित पडेल. मोरास शाप दिला कीं, तुह्मी नपुंसक व्हाल व तुमच्या नयनाश्रूंपासूनच तुमची संतति वाढेल. चक्रवाकांस शाप दिला कीं, दिवसा मात्र तुमची व तुमच्या स्त्रियांची गांठ पडेल. मूर्खांनो, मी रामचंद्र येथें विरहज्वरानें युक्त असतां मला हिणावतां कां? ते दुर्जन राक्षस तुमच्या बायका कां पळवून नेत नाहींत? माझीच कशी नेली. हाय हाय! जानकि! जानकि! तुझ्यासारखी गुणवान् स्त्री मला मिळणार नाहीं. अशा तुला मी आतां कोठें गे पाहूं! अशा प्रकारें, तो शोक करीत असतां तेथून जवळच असलेल्या ऋष्यमूकपर्वतावरून नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव, हनुमान् ह्यांची दृष्टि ह्या दोघांवर गेली.

# किष्किंधाकांडप्रारंभ.

## अध्याय सतरावा.



### श्रीरामसुग्रीवसख्य, वालिवध.

पंपासरोवरतीरीं श्रीरामचंद्र असतां त्यांस ऋष्यमूकपर्वतावरून त्या पंचवानरांनीं पाहतांच सुग्रीव अगदीं घाबरून गेला. त्याला वाटलें कीं, ज्याअर्थी ह्यांचेजवळ धनुष्य, भाते आहेत त्याअर्थी हे वालीनेंच दोघे मानववीर मला मारण्यासाठीं पाठविलेले असावेत. अशा भयंकर कल्पनेनें तो कोणाशीं कांहीं एक न बोलतां धूम पळत सुटला. तो असा झाडें, वनें, डोंगर, रानें ओलांडीत गेला असतां त्याचें जाण्याचें कारण ध्यानांत आणून हनुमंतानें त्याचे मागोमाग पळ काढून त्यास धरलें, तेव्हां सुग्रीवानें आपलें पळण्याचें कारण त्याला कळविलें. मग मारुतीनें त्यास धीर देऊन परत आणलें. नंतर मारुति ह्मणाला, आतां मी जाऊन ते कोण आहेत ह्यांचा तपास करून येतों. कांहीं शंका येतांच मी तुला हातानें खूण करीन. असें बोलून स्वारी चटकन् उडून रामचंद्र ज्या वटवृक्षतळीं बसले होते त्या वृक्षावर बसून वानरचेष्टा करूं लागला. तेव्हां रामचंद्र लक्ष्मणाला ह्मणाले, रे लक्ष्मणा! पाहिलास हा वानर कसा नामी दिसतो तो! ह्याची लंगोटी आणि कटिसूत्र पहा कसें लखलखीत सुवर्णाचें आहे तें! 'तुझी लंगोटी व कटिसूत्र जो ओळखील तोच तुझा स्वामी' असें अंजनीनें हनुमंतास सांगून ठेविलें होतें. त्यावरून हें रामवाक्य ऐकतांच मारुतीस आश्चर्य वाटलें कीं, माझें श-

रीर केवढें आणि हा स्वामी केवढासा ! हें जुळावें तरी कसें. तेव्हां आतां ह्याची परीक्षा घेणें भाग आहे. अशा विचारानें त्यानें एक भली मोठी बळकट खांदी तोडून रामाचे अंगावर टाकली. ती रामानें सहज धनुष्याच्या टोंकानें उडवून दिली. नंतर मारुतीनें प्रचंड गर्जना करून पांच पर्वत रामाचे अंगावर झोंकून दिले. तेव्हां ते एकाच बाणानें रामानें चूर्ण करून टाकले. त्या बाणाच्या पिसाऱ्याचा वायु मारुतीस लागतांच तो उंच उडून गरगरां फिरूं लागला. तेव्हां मात्र हा खरा आपला स्वामी असें त्यास कळलें. परंतु त्यावेळीं तो मोठ्या संकटांत होता. इतक्यांत वायूनें त्या आपल्या लेंकरास पोटाशीं धरून सावध करून रामरहस्य सांगून त्यास शरण जाण्यास सांगितलें. तें ऐकून मारुतिराय मुकाट्यानें येऊन रामचरणीं लागला. रामचंद्रानें त्यास चटकन् उचलून हृदयीं धरलें. अशा प्रकारें ते हरि हर एक झाले. रामचंद्र त्यास ह्मणाले, यावच्चंद्रसूर्य तूं चिरंजीव होशील. नंतर मारुतिराय रामचरण चुरीत बसून ह्मणाले. हे भगवंता रामचंद्रा ! ह्या समोरच्या ऋष्यमूकपर्वतावर वानरराज सुग्रीव रहात आहे. त्याची आपली भेट करून द्यावी असा माझा हेतु आहे. त्यापासून आपलें पुष्कळ काम करून घेतां येईल. रामचंद्र ह्मणाले, सुग्रीव हा कोण आहे ? तेव्हां हनुमान् सांगूं लागले कीं, ब्रह्मदेव एकदां ध्यानस्थ असतां त्याचे नेत्रांतून प्रेमाश्रु पडून त्यांपासून ऋक्षराज निर्माण झाला. महाचपल तो वानरवीर ब्रह्मनंदन. तो एके वेळीं हिंडतां हिंडतां एका सुंदर सरोवरांत स्नान करीत असतां सुंदर असें स्त्रीरूप पावला. पुरुषानें येथें स्नान करतांच तो स्त्रीरूप होईल असा त्या सरोवरास पार्वतीचा शाप होता, ह्मणून असें झालें. मग तो तेथें हिंडत असतां सूर्य व इंद्र ह्यांचे दृष्टीस प-

डला. ह्या सुंदर स्त्रीस आपण वरावें असें त्यांच्या मनांत होतें. परंतु लज्जेनें तो (ती) शर्मून गेल्यामुळें दोघांचाही तेथें कांहीं इलाज चालेना. इतक्यांत त्यांचें रेतही तिचेच अंगावर पडलें. त्यांत आधीं शक्रेरेत पडून तत्काल वालीनामा वानरवीर निर्माण झाला. व मागून सूर्यरेत तिच्या कंठावर पडून सुग्रीव हा निर्माण झाला. हें वर्तमान ब्रह्मदेवास कळतांच त्यानें पार्वतीची प्रार्थना करून पूर्ववत् पुत्र करून पुत्र व दोघे नातू ह्यांस किष्किंधानगर निर्माण करून वालीस सर्व राज्याचा अधिकार दिला. इंद्रानें वालीला एक विजयमालाही दिली. तेणेंकरून त्याचेपुढें कोणीही वीर टिकेनासा झाला. ह्यानंतर कांहीं कारणानें वाली व सुग्रीव ह्यांमध्यें राज्यासंबंधी तंटा उत्पन्न होऊन वालीनें सुग्रीवस्त्री रुमा ही घेऊन त्यास हाकलून दिलें. त्या दिवसापासून दर सहा महिन्यांनीं उभयतांचें आजवर प्रचंड युद्ध होत गेलें. सुग्रीवाचा असा अनिष्टकाल जाणून सूर्यानें त्यास माझ्या हातीं देऊन सांभाळ करण्यास सांगितलें. तें ऐकून रामचंद्रानें थोडक्यांत त्यास आपली हकीगत सांगून ह्मटलें कीं, मी वालीचा वध करून सुग्रीवाची बायको व राज्य त्यास देईन ह्याबद्दल मी तुला वचन देतों. व सुग्रीवाचें हें काम मीं आधीं केल्यावर त्यानें फक्त माझ्या बायकोचा शोध मात्र करावा. तर आतां जा त्याला भेटीला घेऊन ये. तें ऐकतांच मारुतिरायानें सुग्रीवाकडे जाऊन त्यास सर्व मजकूर सांगून त्याची पूर्ण खात्री करून नळ, नीळ, जांबुवंत, सुग्रीव ह्यांस रामचंद्राचे चरणीं आणून अग्निसाक्षित्वानें उभयतांचें सख्य करून दिलें. त्यावेळीं सर्व वानरांनीं भुभुःकारानें ब्रह्मांडगोल गाजवून सोडला. नंतर सुग्रीव ह्मणाला, प्रभो ! कालच वाटतें एक राक्षस एका

स्त्रीला घेऊन आकाशमार्गानें जात होता. व तीही शोकानें असें ह्मणत असे कीं, हे धनुर्धरा रामचंद्रा, हे सौमित्रा, धांवा हो धांवा, ती तर आह्मी डोळ्यांनीं पाहिली. व तिनें कांहीं डागिन्यांची गठडीही आमचेकडे टाकून दिली आहे. रामास ह्याचें मोठेंच आश्चर्य वाटून त्यानें ते डागिने आणवून पाहिले व लक्ष्मणासही ओळखावयास सांगितलें. तेव्हां तो महासाधुपुरुष ह्मणाला, हे प्रभो! नित्य त्रिकाळ वंदन करते वेळीं हीं पादभूषणें मी पाहत होतों, हीं खात्रीनें त्यांचींच आहेत, वरकड अलंकार माझ्या मुळींच पाहण्यांतले नाहींत, कां कीं, चरणांवांचून मीं सीतामाईच्या शरीरापैकीं कोणताही भाग पाहिला नाहीं. धन्य आहे लक्ष्मणाची! असो. पण सीतेचे अलंकार पाहून रामचंद्राला अत्यंत शोक झाला. तेव्हा सुग्रीव ह्मणाला, हे रामचंद्रा! मी आपल्या पायांचीच शपथ करतों कीं, सीतेचा शोध करून मी तीची आपणास भेट न करवीन तर मला घोर नरक प्राप्त होवो. रामही ह्मणाले, तुझें कार्य केल्याशिवाय मी आधीं सीतेचा शोध करीन तर मला दशरथाचीच शपथ आहे. तर जा आतां वालीस हाक मार, असें बोलून धनुष्याला गुण चढविला. तेव्हां सुग्रीव ह्मणाला, प्रभो! समोर लढाईनें वाली ऐकायचा नाहीं, तर गुप्तपणेंच त्यावर बाण टाकला पाहिजे. राम ह्मणाले, वालीचें व तुझें एवढें वैर वाढण्याचें कारण तरी काय? सुग्रीव ह्मणाला, महिषासुर दैत्याचा पुत्र दुंदुभि दैत्य हा महाबलाढ्य असे. तो एकदां वालीशीं युद्ध करण्यास आला. पण वाली काय महापराक्रमी त्यानें त्याला गरगरां फिरवून धाडकन् आपटून त्याचा प्राण घेतला. नंतर त्याचें शतयोजनांचें शरीर वालीनें त्या ऋष्यमूकपर्वतावर झोंकून दिलें. तेथें मातंगप्रभृति

बहुत ऋषींचे आश्रम होते ते मोडून गेले. तेव्हां त्यानें वालीस असा शाप दिला कीं, तो तेथें जातांच मृत्यु पावावा. रामचंद्रा! त्या प्रेताचा प्रचंड सांगाडा अझून तेथें पडला आहे. मग हा बापाचा सूड घेण्यासाठीं त्याचा मयासुर नामा पुत्र वालीशीं युद्धाला आला, परंतु वालीच्या एका बुक्कीसरसा मयासुर भडभडां रक्त ओकत एका विवरमार्गानें पाताळीं गेला. वालीही मग मला विवरद्वारीं रक्षणास ठेवून आंत गेला. मग मी तेथें कांहीं थोडे दिवस रक्षणास बसलों असतां यक्ष, गंधर्व मिळून आमचे नगरीवर लोटले. तेव्हां मी विवरद्वारीं एक पर्वत टाकून जाऊन त्यांचा पराजय केला. आणि मग वीस महिने लोटले तरी वाली आला नाहीं, तेव्हां त्याचा कांहीं तरी विपरीत परिणाम झाला अशा कल्पनेनें प्रधानांनीं मला राज्याभिषेक केला. इतक्यांत वाली मयासुराचें शिर घेऊन आला. वीस मास निराहार असल्यामुळें त्याची दृष्टि मंद झाली. त्यानें नखांनींच तो पर्वत फोडून मार्ग मोकळा केला व तत्काळ सभामंदिरीं आला. तों मी गादीवर होतों. मला पहातांच तो शस्त्र घेऊन मजवर धांवला. तेव्हां नळ, नीळ, जांबुवंत, हनुमंत हे मला पळवून ऋष्यमूकपर्वतीं गेले. वालीस तेथें जाण्याबद्दल शाप असल्यामुळें, तेथें मला निर्भय रहातां आलें. ह्यानंतर दर सहा सहा महिन्यांनीं उभयतांचीं युद्धें होत गेलीं. दोघांचें बळ सारखेंच आहे परंतु त्याचे कंठीं जी विजयमाळ आहे तेणेंकरून तो मला भारी आहे. रामचंद्रा! ते पलीकडे वांकडे तिकडे सात तालवृक्ष आहेत, ते एकाच बाणानें सातही तोडणाराचे हातानेंच वालीचा मृत्यु आहे. तें ऐकून रामचंद्रानें एकाच बाणानें ते सातही वृक्ष छेदले. नंतर दुंदुभीचें प्रचंड प्रेतही प्रभूनें नुस्त्या पायाच्या अंगठ्यानें दूर उड-

वून दिलें. असा आपला पुरुषार्थ दाखवून सुग्रीवास वालीशीं युद्धाला पाठविलें. तेव्हां सुग्रीवानें किष्किंधेंत जाऊन प्रचंड सिंहनाद केला. त्या बरोबर वालीही विजयमाळा घालून धांवला. तेव्हां त्याची स्त्री तारा ही आडवी येऊन ह्मणाली कीं, काल अंगद शिकारीस गेला होता, तेव्हां सुग्रीवास कोणी दोन मानववीर सहाय्य झाले आहेत असें तो सांगत आहे. तें ऐकून तो महावीर तिला ह्मणाला, कांहीं असो, युद्धास जाणें भाग आहे; मेलों तर हीच भेट, वांचलों तर येईनच. ह्याप्रमाणें बोलून तो समरभूमीवर येऊन पोंचला. मग तत्काल दोघांचें द्वंद्वयुद्ध जुंपलें. महाबलाढ्य दोघेही वीर. त्यांच्या भूभुःकारांनीं ब्रह्मांड गडबडून गेलें, दणदणाटांनीं नक्षत्रपात होऊं लागले. पृथ्वी थरथर कांपूं लागली. अशा प्रकारें घोर युद्ध चाललें असतां रामचंद्रानें अचुक वालीच्या जिव्हारीं बाण मारून त्यास पाडलें. मग त्याच्या देहांताचा प्रसंग येतांच रामचंद्र त्याचे जवळ गेले. तेव्हां तो ह्मणाला, रामचंद्रा! तूं एकपत्नीव्रती असतां ही अपकीर्तिरूप दुसरी स्त्री कां बरें वरलीस? विनापराध तूं मला बाण मारलास. राम ह्मणाले, रे, तूं सावज, पारध्यांनीं सावजास सावध करून कधीं शिकार केली आहे काय? शिवाय बंधुस्त्रीचा तूं अभिलाष केलास, अशा तुला शिक्षा करणेंही योग्य होती. वाली ह्मणाला प्रभो! आपल्या हातानें मला मरण आलें येणेंकरून मी मुक्त झालों. असो, रामचंद्रा! तो दहातोंड्या ह्याच मार्गानें सीतामाईस घेऊन गेला. मी तर ह्याला काखेंत मारून चतुःसमुद्रांची यात्रा करून अंगदाचे पाळण्यावर खेळण्यासारखा टांगला होता. त्या किरड्याची बिशाद ती किती! पण मी हतभागी; मला आपली सेवा घडली नाहीं. रामचंद्र ह्मणाले, असें असेल

तर मी आतांच तुला सावध करतों. वाली ह्मणाला, मला सावध करणाऱ्या तुला रावण काय भारी आहे? पण मला मात्र तुझें रूप पाहतांना मरण येणें दुर्लभ आहे. इतक्यांत सुग्रीवही स्फुंदतच त्याचे जवळ गेला. तेव्हां वाली ह्मणाला, धन्य रे तूं माझा बंधु, तूं मला अंतकालीं श्रीराम भेटविलास. असो, आतां तुह्मीं मिळून सीतामाईस सोडवून आणावें असें बोलून त्यानें त्याचे कंठांत विजयमाला घातली व तत्काळ रामरूप पाहत पाहतच देह सोडून तो वैकुंठीं गेला.

---

## अध्याय अठरावा.

### वानर सीताशोधास जातात.

आपला पति युद्धांत पडला हें ऐकून अंगदासह तारा शोक करीतच तेथें आली. तेव्हां रामचंद्रानें तिचें परोपरी समाधान करून तिचा शोक तर दूर केलाच, आणि तिचेकडून सुग्रीवास माळ घालवून शिवाय श्रेष्ठ अशा पतिव्रतांत तिची गणनाही पण केली. ईश्वरकरणी अघटित ती ह्यालाच ह्मणतात. असो. मग तत्काळ वालीची पुढील व्यवस्था लाववून लक्ष्मणाकडून सुग्रीवास राज्याभिषेक करविला. अंगदास प्रधानकी दिली. आणि ते दिवस पावसाचे असल्यामुळें ते संपेपर्यंत सीताशोधाचें काम तहकूब केलें. पण चातुर्मास लोटला तरी सुग्रीवाकडून कांहींच चळवळ दिसेना. तो दोन स्त्रियांशीं चैन मारीत व मद्यप्राशन करून सर्वकाळ घूर्णित होऊन असे. अशाला रामकार्य कोठून आठवणार? तरी ह्या प्रसंगीं मारुतीनें एक वेळ त्याला आठवण दिली होती. तेव्हां तो ह्मणाला, जमवा

वानर, काम चालू करा. असें बोलून स्वारी खुशाल दोघी स्त्रियांस आलिंगून चैनींत बसली. ह्याला पुरती एक घटकाही लोटली नसेल तोंच रामाज्ञेवरून त्याला शिक्षा देण्यासाठीं लक्ष्मण धनुष्यावर बाण ठेवून प्रचंड गर्जना करीत त्याचे द्वाराशीं येऊन पोंचला. तो काय परम दैदीप्यमान दुसरा सूर्यच! त्याला पहातांच सर्व वानर भयभीत होऊन धांवतच सुग्रीवाकडे गेले. तेव्हां त्याचेही डोळे उघडून तोही गडबडून मारुतीस शरण गेला. पण मग मारुति ह्मणाला, आतां लक्ष्मणापुढें आपलें कांहीं चालणार नाहीं. तेव्हां मात्र सुग्रीव अगदींच दीन होऊन दोघी स्त्रियांसह येऊन लक्ष्मणाच्या पायां पडला. त्याच्या स्त्रियाही लक्ष्मणाजवळ चुडेदान मागूं लागल्या. परंतु लक्ष्मण ह्मणाला, मी ह्यास ठार केल्यावांचून कधीं सोडणार नाही. हा रामकार्य विसरून चैनींत कसा राहिला? इत्यादि तीव्र भाषणें बोलूं लागला. तेव्हां हनुमंतानें त्याची पायधरणी करून कसें तरी त्यास ताळ्यावर आणिलें. मग सुग्रीव प्रचंड वानरसेनेसह श्रीरामाकडे येऊन पोंचला. नंतर त्यानें लागलेच दूत पाठवून सप्तद्वीपचे वानर, रीस ह्यांस गोळा करून आणलें. तेव्हां अठरा पद्मं वानर, छपन्न कोटी गोलांगुलें, बहात्तर कोटी रीस अशी प्रचंड श्रीरामसेना तयार झाली. काय तो विचित्र सेनासमूह! पर्वतप्राय त्यांचीं शरीरें! काळा, पांढरा, हिरवा, निळा, जांभळा, तांबडा असे अनेक त्यांचे रंग! पराक्रमीही तसेच. कोणी पर्वत इकडून तिकडे फेंकतो तर, कोणी झाडेंच उपटून आकाशांत फेंकून देत आहे, कोणी आकाशांत उंच उडत आहेत, कोणी शेंपटानें समुद्रांतील लाखों मासे गोळा करून रामापुढें आणून ठेवीत आहेत, कोणी तर रामापुढें वांकड्यातिकड्या उड्या मारून रामापुढें वा-

कुल्याही दाखवीत आहेत असा कांहीं विलक्षण प्रकार करूं लागले. त्यांच्या भूभुःकारानें तर दश दिशा व्यापून गेल्या. असो, मग सुग्रीवानें सर्वांस असें सांगितलें कीं, श्रीरामचंद्राचे स्वाधीन सीतामाई केल्यावांचून जो परत येईल, तो मात्रागमनी होय. त्यास मी धरून आणून त्याचें नाककान कापून गाढवावर बसवून त्याची धिंड काढीन. नंतर रामचंद्र ह्मणाले, सुग्रीवा! हें सर्व ठीक आहे, पण एवढ्या सैन्याला अन्न, वस्त्र, शस्त्रें मी कोठून आणूं? सुग्रीव ह्मणाला, प्रभो! ह्यांना फळेंमुळें हेंच खाद्य; वस्त्रें ह्मटलीं तर त्यांचीं शरीरें; आणि नखें, झाडें, धोंडे, डोंगर हीं त्यांचीं शस्त्रें होत. प्रभो! हा सारा आपलाच खेळ आहे. असो, मग सप्तद्वीपांतील सर्व स्थळें, चतुर्दश लोक, नऊ खंडें येथपर्यंत सीतेचा शोध करण्यासाठीं कोट्यावधि वानर रवाना केले: पण ते सारे रडतच परत आले. मात्र दक्षिणदिशेला गेलेले वानर आले नाहींत. तेव्हां रामचंद्रास काय ती त्यांचीच आशा लागून गेली होती. तिकडे नळ, नीळ, जांबुवंत, सुषेण, अंगद, हनुमान्‌आदिकरून शंभर वानरवीर गेले होते. ते तिकडे जात असतां मारुतिराय चटकन् माघारे येऊन नम्रपणें रामचंद्रास विचारूं लागले कीं, भगवन्! मातोश्रीस आह्मीं कधीं पाहिलें नाहीं, तर त्यांना ओळखावें कसें? आणखी मी आपले चरणांचा दूत आहें, ह्याची त्यांना तरी साक्ष कशी पटावी? तें ऐकून रामचंद्रांस परम आनंद झाला. ते ह्मणाले, हनुमंता! मला माझ्या कार्याविषयीं तुझाच खरा भरंवसा आहे. असो, तुला खूण सांगतों ऐक. सीतेच्या भोंवतालचे चौफेर बारा हातांचे आंतील वृक्ष, पाषाण 'राम राम' असा उच्चार करीत असतात, शिवाय तिच्या शरीराचा कस्तूरीप्रमाणें सुगंध अर्धयोजनपर्यंत पसरलेला असतो. अशा

तिला ओळखून अंतरखूण ही सांग कीं, कैकेयीमंदिरीं मीं तुला वल्कलें नेसविलीं. आणि खुणेसाठीं ही आंगठी दाखव. असें बोलून रामनामांकित मुद्रिका त्याचे बोटांत घालून त्यास आलिंगून वरदहस्त त्याचे मस्तकीं ठेवून लावून दिलें. नंतर मारुतिरायहीं भगवंतांस नमन करून परत आपल्या मंडळींत येऊन आनंदानें सारेच गर्जना करीत आकाशमार्गानें किलाणावर किलाणें मारीत चालले. जणुं ते सपक्ष पर्वतच रामनाम गर्जत चालले आहेत असें वाटे. असे ते जात असतां एकाएकीं त्यांचीं किलाणें अडखळून मुरकुंड्या वळल्या, आणि लागल्याच त्यांच्या नाड्या आकर्षिल्या जाऊन त्यांस उठवेना देखील. ह्याचें कारण ते ज्या वनावरून जात होते त्या वनास दंडकऋपीचा शाप होता. कां कीं, त्याचा अठरा वर्षांचा मोठा विद्वान् मुलगा तेथील वनदेवतेनें खाऊन टाकला होता. तेवढ्यावरून तेथें संचार करणारा प्राणी ठार होईल असा ऋपीचा शाप होता. वानर तेथें ठारच व्हायचे, पण ते रामनामीं सावध होते ह्मणून वांचले. असो, तो दंडकपुत्र ब्रह्मराक्षस होऊन तेथेंच संचार करीत होता, तो ह्यांना खाण्यासाठीं ह्यांच्या अंगावर धांवला. परंतु इतक्यांत अंगदानें अमळ तकवा धरून चटकन् त्याची तंगडी धरून त्यास गरगरां फिरवून आपटून ठार केलें. तेव्हां तो पूर्वरूप धारण करून हा सर्व मजकूर वानरांस सांगून बापास भेटण्यास गेला. पुढें वानरांला रस्ताच सुचेनासा झाला, दिशा कोणची हेंही उमगेना, त्या दुर्घट अरण्यांत खाण्यापिण्यासही कांहीं मिळेना, तेणेंकरून ते मोठ्याच संकटांत पडून गेले. ते मग तसेच चालत असतां प्रचंड पर्वतामधून एक मोठें विवर असून त्यांतून पांखरें जात येत होतीं असें त्यांचे दृष्टीस पडून ते त्याच मार्गानें जाऊं लागले. चार कोस तो बोगदा लांब

होता. तेथून जातांना त्यांचा हवेच्या योगानें फारच कोंडमारा झाला. शेवटीं मारुतिरायानें मोठा हिय्या करून पुढें चालून शेंपटानें बाकीच्या सर्वांस गुंडाळून घेतलें. अशा प्रकारें ते एकदांचे विवरांतून बाहेर पडले व एका सुंदर उपवनांत पोंचले. परंतु तेथील वृक्ष जरी फळांनीं भरले होते तरी ते फारच उंच असल्यामुळें व वानर अगदींच थकले असल्यामुळें त्यांच्यानें झाडावर चढून फळें काढवतना. अशा प्रकारें ते दीन होऊन पडले असतां सुप्रभा नांवाची एक देवस्त्री तेथें आली. तिला मारुतीनें विचारलें कीं, हीं येथें सोन्याचीं घरेंदारें असून येथें फल व उदकही अमृततुल्य आहे, तेव्हां हें स्थळ कोणीं बरें निर्माण केलें ? ती ह्मणाली, मयनामें महा मायावी दैत्यानें तपेंकरून ब्रह्मदेवास प्रसन्न करून त्याचेपासून हें मिळविलें आहे. हें विवर त्याचेचसाठीं केलें होतें, येथें असतां त्याला कोणाचें भय नसे. तो मोठा देवद्वेष्टा व दैत्यांची बाजू राखणारा होता. तेव्हां इंद्रानें ब्रह्मदेवाची प्रार्थना करून हेमा नामें एक स्त्री निर्माण करून तिला त्याकडे पाठविलें. तिनें युक्तिप्रयुक्तीनें त्याला त्या विवरांतून बाहेर काढलें, तोंच इंद्रानें वज्रानें त्यास ठार केलें. नंतर ब्रह्मदेवानें हेमेसाठीं हें हेममयनगर रचून दिलें. येथें ती कैक काल राहून ती सत्यलोकीं गेली. मी तिची दासी ! तिनें रक्षणासाठीं मला येथें ठेवलें आहे, व 'येथें कोणी वानर येतील तेव्हां तुझा उद्धार होईल' असें तिनें मला सांगितलें आहे. तें ऐकून मारुतीनें आपलाही सर्व वृत्तांत तिला सांगितला. तेव्हां तिनें मोठ्या प्रेमानें फलें व उदक देऊन सर्व वानरांस तृप्त केलें, आणि त्यांस मार्ग सुचेना ह्मणून नेत्र झांकावयास सांगून अर्धघटिकेंत तिनें

त्यांना दक्षिणसमुद्रतीरीं पोंचवून आपण किष्किंधेस येऊन रामदर्शन घेऊन त्यांचे आज्ञेनें बदरिकाश्रमीं तप करीत राहिली.

इकडे वानर समुद्रतीरीं येऊन चिंताक्रांत होऊन बसले. व शेवटीं कांहींच उपाय सुचेना तेव्हां अग्निकाष्ठें भक्षून प्राण देऊं, परंतु काळ्या तोंडानें परत जावयाचें नाहीं. अशा निश्चयानें त्यांनीं अग्निकुंड तयार करून प्रथम मारुतीनें त्यांत उडी टाकली, परंतु अग्नि विझला. पुन्हां त्यांनीं प्रदिप्त केला तरी पूर्ववतच. पुन्हां एक वेळ त्यांनीं असें करून पाहून आपण रामाचे अपराधी तेव्हां अग्नीही आपणांस स्थान देईना. असें समजून शेवटीं समुद्रांतच बुडून मरण्याचा निश्चय करून तेथें जाऊन मारुति क्षणमात्र ध्यान करीत बसला, व बाकीचे वानर चिंता करीत पडले. इतक्यांत जटायूचा बंधु संपाती चोंच उघडून ह्यांना खाण्याकरितां ह्यांचेवर धांवला. फारच प्रचंड त्याचें शरीर, असा तो अरुणपुत्र वानरांचे अंगावर येतांच त्यांचे मुखांतून रामराम ध्वनि संपातीचे कानीं येतांच त्याचे पंख पूर्वीं जे जळाले होते ते फुटले. मग त्याला परम आनंद होऊन तो रामचंद्र कोठें आहे? माझा बंधु जटायु त्याचे जवळ आहे असें म्हणाला. तेव्हां वानरांनीं त्याला कच्ची हकीगत सांगितली. तेणेंकरून जटायूबद्दल त्याला फार दुःख झालें. तो ह्मणाला, आह्मी दोघेही पैज मारून सूर्यमंडळ पाहण्यासाठीं उडालों, तों माझे पंख जळाले. तेव्हां मी ओरडतांच अरुणानें मला संभाळलें व श्रीरामदूतांच्या दर्शनाबरोबर पंख फुटतील असें त्यानें मला सांगून ठेविलें होतें, तें आज प्रत्ययास आलें. नंतर तो ह्मणाला, ह्या समुद्राच्या पलीकडे लंकेंतील अशोकवनांत सीतादेवी आहे. तुह्मी माझ्या पाठीवर बसाल तर तुह्मांस तेथें नेऊन पोंचवितों, अथवा येथून थोड्या अंतरावर एक प्रचंड मैलागिरिचंदन

आहे, त्याची एक खांदी तहत चारशें कोस लांब असून ती लंकेत पोंचली आहे तीवरून जा, अथवा सामर्थ्य असेल तर उडी मारून जा. ह्याप्रमाणें सांगून तो गेला. नंतर उडी मारून जाण्याचाच वानरांनीं संकेत ठरवून सर्वांनीं मारुतिरायाचीच ह्याबद्दल प्रार्थना केली. तेव्हां त्या एकनिष्ठ रामभक्तास एकदम स्फुरण चढलें. तो ह्मणाला, आतां तुह्मी सावधपणें झाडें, पर्वत कवळून असा, माझ्या अंगाच्या वाऱ्यानें तुह्मी उडून रानोमाळ भडकाल. ह्याप्रमाणें सर्वांस सांगून फारच प्रचंड रूप धरून महेंद्राचलीं स्वारी रामध्यान करीत उभी राहिली.



# सुंदरकांडप्रारंभ.

## अध्याय एकोणिसावा.



### मारुतिराय समुद्रोल्लंघन करून लंकेंत प्रलय माजवितात.

मारुतिरायानें ह्या वेळीं फारच अवाढव्य रूप धारण केलें होतें. त्याच्या संवयींतले वानरही तें पाहून घाबरले. मग 'जय श्रीरघुनाथ' ह्याप्रमाणें मारुतिरायानें उच्चार करून सर्वांनीं एकदम भूभुःकार केला. व तत्काळ मारुतिराय रामनाम स्मरत भूभुःकार व शेपटाचे फडाके वाजवीत आकाशमार्गांतून चालते झाले. हाय! हाय! काय त्या वेळचा तो प्रसंग! जणुं प्रलयकाल ह्मणतात तोच होण्यास आरंभ झाला काय असें साऱ्या त्रैलोक्यास भासूं लागलें, पोटाशीं धरलेल्या पर्वतांसह वानरही जागचे उडत सुटले, समुद्राचें पाणी मारुतिरायाच्या उड्डाणवेगानें खूपच उंच उसळूं लागलें, भूभुःकारांनीं तर दिग्गजांचीं स्थानें गडबडलीं, नक्षत्रपात होऊं लागले, इंद्रही घाबरून गेला, देव, यक्ष, गंधर्व, उरग, ह्यांच्या तर कानठाळ्याच बसल्या, श्रीशंकराचीही समाधि ढळली, पार्वती तर घाबरून शंकराच्या गळ्यांतच मिठी मारून राहिली, भूभुःकाराच्या प्रतिध्वनींनीं आकाशपाताळ कलकलून गेलें, लंकानगरी तर एकसारखी डळमळूं लागून रावणही गडबडून गेला. अशा प्रकारें चोहींकडे मोठे उत्पात होऊं लागले. श्रीरामरावणांचे युद्धांत काय तो अति भयंकर प्रसंग असा हाच झाला. धन्य ती अंजनी! असो, अशा प्रकारें तो महावीर पित्याच्या वेगासही तुच्छ करीत चालला

असतां देवांनीं त्याचें बल पाहण्यासाठीं रंभा देवी आडवी पाठविली. ती प्रचंड जबडा वासूनच होती. तेथें येतांच मारुतीची उडी तिच्या तोंडांत पडली, तरी तो सावधच. तो चटकन् लघुरूप घेऊन कानांतून बाहेर पडला. तेव्हां ती देवी मारुतिरायाचें स्तवन करून चालती झाली. नंतर समुद्रानें अमळ मारुतिरायास विश्रांति व्हावी ह्मणून मैनाकपर्वतास वर केलें, परंतु एकाच हातानें दडपून त्यास पाताळीं घातलें. ह्यानंतर राहूकेतूंची आई सिंहिका ही मारुतीस आडवी आली, तेव्हां तिच्याही तो तोंडांत पडला. मग तिचें पोट फोडून तिला ठार करून स्वारी पुढें जी उडाली ती लंकेंत जाऊन पडली. तेणेंकरून तें स्थान दणाणून तेथील खूपच घरें कोसळलीं. असो, मग स्वारीनें पटकन् लहानसें रूप धारण केलें. पडलंकेस क्रौंच्यानामें रावणाची एक धाकटी बहीण होती तिचा घर्घरनामा नवरा इंद्रानें मारला, तेव्हां रावणानें तिला पडलंकेंत ठेवलें होतें. तिनें दणदणाट कशाचा झाला ह्मणून शोध करतां हा वानर तिला आढळून तिनें त्यास तसेंच गिळून टाकलें. तेव्हां मारुतीनें तिच्या आंतड्यांस ओळकंबे मारून तिचा प्राण फारच कासावीस केला व मग पोट फोडून बाहेर येऊन बहुतेक राक्षसींचा नाश करून लंकेंत झाडा घेत चालला. ती वेळ रात्रीची होती, तेव्हां सूक्ष्मरूपानें शोध करीत असतां इंद्रजिताचे मंदिरीं गेला. त्या वेळीं तीं दोघें एकत्र होतीं. सुलोचनेचें सौंदर्य पाहून हीच सीता, ह्या दुष्टाशीं रत झाली असावी असें जाणून त्या दोघांस ठार करावें अशा विचारांत मारुतिराय आहे तोंच सुलोचना ह्मणाली, तुमच्या पित्यानें रामचंद्राची स्त्री सीता हिला येथें आणलें ह्याचा परिणाम चांगला होणार नाहीं. असें कांहीं ती बोलतांच ही सीता नाहीं असें समजून

मारुतिराय तेथून उठून धुंडाळे घेत चालला असतां ठिकठिकाणीं तेथला वाईट प्रकार पाहून त्याचें मन कंटाळून गेलें, तेथील घाणीनें तर त्याचा प्राण कासावीस होऊं लागला. जिकडे तिकडे रक्त, मांस, हाडें ह्यांचा चिखल. असो, तो रामभक्त हिंडतां हिंडतां बिभीषणाचे मंदिरीं गेला. तेथील आचारविचार, स्वच्छता पाहून मात्र त्याचें चांगलेंच समाधान झालें. व रामचंद्राकडून रावणास निर्दाळवून ह्यासच लंकेचा राजा करीन, असें मारुतिरायानें आपल्या मनाशीं ह्मणून ठेवलें. असो, मग तेथून कुंभकर्णाकडे गेला, तेथें तर दुर्गंधीनें त्याला नाक दाबूनच पळावें लागलें. अशा प्रकारें त्यानें पुष्कळ घरीं शोध केला, परंतु सीतेचा थांग लागेना. तेव्हां काय तिनें प्राण दिला, किंवा रावणाचे हातून निसटून पडून मेली, किंवा रावणाच्या दृढालिंगनानें चिरडून मेली, अशा प्रकारें कल्पना करीत व आपले कष्ट वृथा गेले ह्मणून खेद करीत कांहीं वेळ घालवून एकदम अवसान धरून ह्मणाला, चिंता नाहीं, आधीं हें नगर पालथें घालीन तेव्हां मग पुढचा काय तो विचार. असें बोलून एकदम अवसान धरून भडाभड लंकेचे प्रचंड वाडे मोडीत चालला, व भेटेल त्यास भराभर फेंकून देऊं लागला. राक्षसराक्षसी एकत्र निजलीं असतां तशींच त्यांना रस्त्यावर आणून ठेवी. अशा प्रकारें सारी रात्र त्यानें प्रलय मांडला. लंकेचे मोठमोठे दरवाजे त्यानें मोडून पार समुद्रांत झोंकून दिले. लोकांचें द्रव्य घरांतून काढून त्यांची दाणादाण करून टाकली. तेव्हां लंकेंत एकच कल्लोळ मांडला. तेव्हां सीतेनें हें कोणी भूत चेतविलें अशी सर्वांची समजूत होऊन गेली.

रात्रभर असा दंगा करून मारुतिराय स्वस्थ राहिले नाहींत.

उजाडतांच राजवाड्यावर बसून पाणी भरून जात असलेल्या स्त्रियांच्या कानांत, व नाकांत हळूच आपलें शेंपूट घालून त्यांस घाबरवून रावणाचे वाड्यापुढें शेंकडों घटस्फोट केले. त्याचप्रमाणें जे जे राजकुमार, प्रधान राजदर्शनास आपल्या वाहनावर बसून येत त्यांचीं वाहनें अशींच शेंपटानें पाडून त्यांस पिटाळून लावी. अशा प्रकारें दिवसभर दांडगायी करून लंकेच्या लोकांस त्राहि भगवन् असें ह्मणावयास लावलें. नंतर अस्तमान होतांच स्वारी रावणाच्या सभेंत गुप्तरूपानें त्याच्या सिंहासनामागें येऊन उभी राहिली. तेव्हां हेरांनीं हें गांवांतील प्रळयाचें वर्तमान रावणाचे कानीं दिलें. तेव्हां त्यांच्यावरच तो कातावला. मग रावणाची खात्री करण्यासाठीं प्रथमतः नापिक वस्तऱ्यानें त्याची मिशी साफ करीत असतां त्याचे कानांत हळूच शेंपटी घालून त्यास डचकावलें. तेव्हां त्याचा हात भरकन् मिशीवरून जाऊन ती साफ झाली. त्यामुळें रावणानें त्याला एक थापट मारली. त्या वेळीं मारुतीनें रावणाच्या पाठींत एक बुक्की देऊन त्याचे दहाही मुकुट पाडिले, छत्र मोडून त्याचा दांडाही रावणास पालथा पाडून त्याच्या ढुंगणांत घालून दिला. नंतर तेथील कोट्यावधि कर्पूरदीपिका विझवून कोणाचे नाक, कोणाचे कान, कोणाचीं धोत्रें, कोणाचीं लिंगें भराभर उपटीत चालला. देवांतक, नरांतक, अतिकाय, प्रहस्त आदिकरून सर्वांची त्यानें खोड काढली. तेव्हां जे ते आपापल्या जागीं चूप राहिले. नंतर मारुतिरायानें रावणाच्या कानांत सांगितलें कीं, मी रामचंद्राचा दूत आहें, आतांच तुझीं शिरें कापून रामाकडे नेतों, परंतु तशी त्याची मला आज्ञा नाहीं. ह्याप्रमाणें बोलून स्वारी तेथून चालती झाली. नंतर पुन्हा दिवे

लावून रावण पाहतो तों जिकडे तिकडे लोक रडत आहेत. येणें-करून तो परम चिंताक्रांत होऊन अंतःपुरांत गेला.

## अध्याय विसावा.

### मारुतिसीताभेट व अशोकवन, अखयादिकांचा विध्वंस.

दिवसभर लंकेंत जीं अरिष्टें उत्पन्न झालीं त्यांचे शांतीस्तव रावण कांहीं दुष्ट हवन करीत बसला आहे, मंदोदरी दूर पलंगावर निजली आहे, तोंच मारुति त्याच्या एकंदर अंतःपुराचा झाडा घेत तेथें येऊन पोंचला. व मंदोदरीस पाहून हीच सीतादेवी असें अनुमान करतो, इतक्यांत रावणही होम आटोपून तिचे शेजारीं येऊन निजला. तेव्हां मारुतीस परम क्रोध तर आलाच, परंतु हळूच जाऊन मंदोदरीचे तोंडाचा वास घेतो तों त्याचें नाक दुर्गंधीनें भरलें, आणि लागलीच मंदोदरीनें रडत उठून ह्मटलें कीं, अहो स्वामी, मला फार वाईट स्वप्न पडलें. तर आतांच सीतेस रामाकडे पोंचती करून द्या. तें ऐकून त्यानें होय ह्मटलें. तेव्हां मारुतीचें मन शांत होऊन तो सीताशोधाविषयीं पुन्हा उत्सुक झाला. इतक्यांत रावणानें एका दासीस ह्मटलें कीं, मंदोदरीचें वचन इंद्रजित कुंभकर्णादिकांसही मोडवणार नाहीं. तेव्हां ही कदाचित् सीतेस सोडून देईल. तर तूं आधीं अशोकवनांत जाऊन बंदोबस्त करून ये. त्याप्रमाणें ती चालली असतां मारुतीही अनायासेंच तिच्या मागोमाग गेला. आणि मग तेथें सीतेस गुप्तपणें पाहून व रामानें सांगितलेल्या सर्व खुणा ओळखून तिचेपुढें रामचंद्राची मुद्रिका ठेवून आपण गुप्तपणें ती

ज्या वृक्षाखालीं होती त्यावर चढून बसला. इकडे ती मुद्रिका सीतेच्या दृष्टीस पडतांच ती घाबरी होऊन शोक करीत असतां तिला जवळच्या राक्षसी दटावूं लागल्या. तेव्हां मारुतिरायानें मुकाट्यानेंच शेंपटानें त्यांचा फडशा उडविला. नंतर आपण तेथें येईपर्यंतचें एकंदर रामचरित्र गायनरूपानें गाऊन सीतेस ऐकविलें, पण तिला दिसला नाहीं. तेव्हां हा कोणी ठक असावा अशी कल्पना करून ती दुःखानें अगदीं बेजार झाली होतीच, तेव्हां वेणींतील आंगुळ काढून गळफांस घेऊं लागली. तें पाहून चटकन् मारुतिराय तिचेपुढें होऊन नमस्कारपूर्वक तिला सारें वर्तमान सांगून संतुष्ट करून खाण्यासाठीं कांहीं फळें तोडण्याची आज्ञा मागूं लागला. तेव्हां ती ह्मणाली, बालका! झाडावर न चढतां जीं फळें तुला सांपडतील तेवढींच घे. इतकी तिची आज्ञा मिळतांच भडाभड शेंपटानें झाडें मोडून फळें ओरबडून खात सुटला. इतक्यांत साठहजार वनरक्षक राक्षस त्याचे अंगावर धांवले. ते त्यानें शेंपटानें गुंडाळून जमिनीवर आपटून ठार करून समुद्रांत फेंकून दिले. मग हें वर्तमान रावणाचे कानीं जातांच त्यानें ऐशींहजार सैन्यासह जंबुमाळी मारुतीवर पाठविला. मारुतिरायानें फारसा उशीर न लावतां त्यांचीही वाट लाविली. नंतर मोठमोठ्या वीरांसह एक लाख सैन्य पाठविलें. तेव्हां त्यास एकदम शेंपटाच्या वेढ्यांत गांठून प्रचंड अर्गळा हातीं घेऊन आंतचेआंत त्यांचें कांढून पीठ केलें. नंतर अखयानामें रावणाचा एक महावीर पुत्र प्रचंड सेना घेऊन आला. पण अखेर त्याची ही शांति येथेंच झाली. ह्यानंतर अशाळीनामें प्रचंड राक्षसीनें येऊन मारुतीस चटकन् गिळून टाकलें. तें वर्तमान रावणाचे कानीं पडतांच तो साखर वांटूं लागून आपणही एक घास

खाणार तोंच अशाळीचें पोट फोडून मारुति जशाचातसाच उभा आहे, हें वर्तमान ऐकून बिचारा शंख करीतच राहिला.

# अध्याय एकविसावा.

## लंकादहन.

मारुतीचा असा प्रचंड पराक्रम ऐकून रावण घाबरला व शेवटीं इंद्रजितास त्यावर पाठविलें. परंतु मारुतीनें असें कांहीं घोर युद्ध केलें कीं, इंद्रजिताचें सारें सैन्य मारून त्याला एका गुहेंत नागवें उघडेंच कोंडून धरलें. तेव्हां ब्रह्मदेवाला मारुतीस येथवर आणण्यासाठीं पाठविलें. मग ब्रह्मदेवानें मुकाट्याच मारुतीची समजूत करून इंद्रजिताकडून ब्रह्मपाश टाकवून त्यास धरविलें. नंतर ते सर्व मारुतिरायास रावणसभेंत घेऊन गेले. तेथें जातांच चटकन् मारुति पाशांतून सुटून रावणाच्या आसनापेक्षांही हातभर शेंपटाचें उंच आसन करून त्यावर बसला. तेव्हां रावण ह्मणाला, रे माकडा! तूं कोणाकडून येथें आलास? तो ह्मणाला, रे दहातोंड्या! मी ज्यानें तुझ्या उरावरलें धनुष्य उचलून तुला वांचविलें, ज्यानें ताटका, सुबाहु, मारीच ठार केले, ज्याची स्त्री तूं चोरून आणलीस त्याचा मी दूत आहें. मीं तुला ठारच मारला असता, पण काय करूं? तशी मला आज्ञा नाहीं. माझा पराक्रम तुझ्या ध्यानांत आला कीं नाहीं? तेव्हां रावण ह्मणाला, पण तुला त्याच रामाची शपथ आहे, तुझें मरण कोठें आहे तें सांग. तो ह्मणाला, माझें शेंपूट जळेल तेव्हांच मी मरेन. तें ऐकतांच आह्मी तें जाळतों असें ह्मणून

त्याच्या शेंपटाला वस्त्रें गुंडाळूं लागले. पण गांवांतील सारीं वस्त्रें भरून शेवटीं लोकांनीं नेसलेलीं पण वस्त्रें सोडून दिलीं. तरी शेंपूट झांकेना, ह्मणून सीतेचें लुगडें आणण्यास सांगितलें. तेव्हां मारुतीनें शेंपूट झांकून घेतलें. नंतर त्यावर खंडोगणती तेल, तूप ओतून चेतविण्यासाठीं रावण विस्तव पुढें करून फुंकूं लागला, तोंच एकदम भडका उडून त्याच्या दाढ्यामिशा भुरकन् जळून गेल्या. असो, मग चांगला जाळ लागतांच मारुतिराय तेथून उडून ज्याच्या त्याच्या अंगावर शेंपूट टाकून त्यास ठार करूं लागले. व घरांवरही शेंपूट टाकून सर्व नगर पेटवून दिलें. येणेंकरून तर मोठाच अनर्थ उत्पन्न झाला. रावणासुद्धां सर्वांस 'दे माय धरणी ठाय' असें होऊन गेलें. शेवटीं बिभीषणासाठीं एक चतुर्थांश लंका शिल्लक ठेवून मारुतीनें शेंपूट समुद्रांत टाकून विझविलें. तेव्हां पाण्यास कढ येऊन कोट्यवधि जलचरें तडफडून मेलीं. नंतर स्वमुखानें आपली कीर्ति रामचंद्रास न सांगावी ह्मणून ब्रह्मदेवाकडून एकंदर पत्र घेऊन सीतेला भेटून उदयीक रामचंद्रास येथें घेऊन येतों असें सांगून नगरदुर्गावरून उडून प्रचंड गर्जना करीत स्वारी पूर्ववत् समुद्र ओलांडून आपल्या मंडळींत येऊन पोंचली. केवढें तें त्यानें त्यावेळीं रूप धारण केलें होतें पण. असो मग मोठ्या आनंदानें ते रामभक्त तेथून उडून सुग्रीवाच्या मधुवनांत येऊन तेथें आनंदाच्या भरांत खुशाल वनाचा विध्वंस करून फराळ करीत बसले, व नंतर किष्किंधेस.जाऊन पोंचले. तेथें गेल्यावर सर्वांनीं रामचंद्राचें दर्शन घेऊन तेथून निघून समुद्रापर्यंतचा व मारुतिरायानें उडी मारल्यापर्यंतचा इतिहास अंगदानें रामचरणीं सादर केला. नंतर पुढच्या मजकुराबद्दल ब्रह्मदेवाचा लखोटा आणि सीतेचा चूडामणि खुणेसाठीं

मारुतिरायानें पुढें ठेवून हात जोडून ह्मटलें कीं, आपण सीतामायीचे भाळीं एकदां मनशीळचा तिलक लाविला होता, ही त्यांनीं अंतर्खूण दिली आहे. तें ऐकतांच रामानें त्यास हृदयीं धरून ह्मटलें, पण तूं एवढ्या समुद्रावरून किनारीं कसा गेलास ? तो ह्मणाला, जातांना आपली मुद्रिका व येतांना मायीचा चूडामणि मला सहाय होता. असो. प्रभो, मातोश्री खुशाल तर आहेतच पण आपली आंगठी त्यांच्या हातांत जाऊं लागली. इतक्या त्या कृश झाल्या आहेत. तें ऐकून रामास फार गहिंवर आला नंतर लक्ष्मण तें पत्र वाचूं लागला. तेव्हां स्वस्तुति न ऐकावी ह्मणून मारुतिराय तेथून दूर जाऊन बसले.

---

## अध्याय बाविसावा.

### पत्रश्रवण व रामचंद्र समुद्रतीरीं जातात.

लक्ष्मणानें तें पत्र उघडतांच सर्व वानर तें ऐकण्यासाठीं मुकाट्याच कान देऊन बसले. मग लक्ष्मण वाचूं लागला. हे अनंतकोटिब्रह्मांडनायका, भृगुरक्षका रामचंद्रा, आपणास माझे शतशः नमस्कार असोत. प्रभो, आपण सीतामायीचे शोधासाठीं अंजनीनंदनास पाठविलें. केवढें तरी त्याचें सामर्थ्य ! त्यास वाटेंत अनेक विघ्नें आलीं तरी आपल्या कृपेनें तीं दूर होऊन तो पडलंकेस येऊन तेथें क्रौंचा नामें रावणभगिनी होती तिचा नाश करून लंकेंत आला. नंतर निकुंभिलेंत शोधतांना सुलोचनेस पाहून तिलाच ठार करणार तों तिच्या भाषणावरून ही सीता नाहीं असें समजून तेथून बाहेर

पडून अगदीं लहान रूप घेऊन सगळ्या नागरिकांची फारच विटं-बना केली. पुढें बिभीषणाचे घरांत शिरतांच त्यास परम समाधान झालें. नंतर रावणाच्या एकंदर अंतःपुरांत हिंडला. मंदोदरीस पाहतांच तेथेंही सुलोचनेप्रमाणेंच झालें. पुढें एका दासीच्या मागो-माग अशोकवनीं जाऊन जगन्मातेस आपली हस्तमुद्रिका दाखवून संतुष्ट केलें. व मग भुकेच्या निमित्तानें तेरा योजनें विस्तीर्ण जें अ-शोकवन त्याचा पार विध्वंस केला. त्यानिमित्त लक्षावधि राक्षसां-सह अक्षनामक रावणपुत्रास ठार करून इंद्रजिताचीही फारच विटं-बना केली. शेवटीं माझ्या सांगण्यावरून इंद्रजिताचे हातून ब्रह्म-पाशांत बांधून घेऊन रावणाचे सभेंत आला. तेथें मग रावणास शब्दघायांनीं फारच ताडण केल्यामुळें त्या मूर्खानें ह्याच्या शेंपटास आग लावली. ह्यामुळें तीन चतुर्थांश लंका जाळून नंतर समुद्रांत शेंपूट विझवून सीतेची गांठ घेऊन पुन्हा समुद्र ओलांडून चालता झाला. धन्य ती अंजनी. असो. शेवटीं लंका जाळली तेवढी सारी पुन्हा सुवर्णमय झाली! ह्याचें येथील लोकांस भारीच आश्चर्य होत आहे. असें पत्र ऐकून रामचंद्रानें मारुतीचें मुख कुरवाळून त्यास पोटाशीं धरलें. सुग्रीवानें किष्किंधेहून अमोल रत्नें आणून त्याचेवरून ओंवाळून टाकलीं. मग रामचंद्रास तो सीतेचा चूडामणि पाहून प्रत्यक्ष जानकीच मारुतीनें आपणांस भेटविली असें वाटून तो फारच आनंदित झालाः तेव्हां मारुति ह्मणाला, प्रभो, माझी मोठी चूक झाली, प्रत्यक्ष सीतामायीस आणलें असतां आपल्यांस किती तरी आनंद होता. असो, पण आतां उशीर काय, हा पहा आतांच आणतों, असें बोलून स्वारी तत्काळ उडालीच. ती को-णाच्याच हातीं लागेना. शेवटीं रामचंद्रानेंच धरून आणून ह्मटलें

अरे थांब. इतक्यांत त्यानें राम, लक्ष्मण, सुग्रीव, अंगद, जांबुवंत ह्या चौघांसही खांद्यावर घेऊन उडत चालून ह्मणाला, चला तर, पुरे झाले येवढे पांचच. वरकडांचें कारण नाहीं. आतांच तुह्मांस लंकेंत नेऊन टाकतों. ह्याप्रमाणें तो अगदीं भरींच भरला. शेवटीं रामचंद्रानें त्यास स्थिर करून सभा करून ह्मटलें, कोणचेंही काम विचारानेंच केलें पाहिजे. तर प्रथमतः लंकेचें मला नीट स्वरूप सांग, आचारविचार, राजपद्धति हीं सर्व मला ऐकूंदे, मग पुढें कायतो विचार. तेव्हां मारुतीनें तेथील सर्व प्रकार वर्णन केला. त्यांत लोक अगदींच दुराचारी असें ऐकून राम ह्मणाले, तर मग आतां मात्र क्षणांत लंकेची रांगोळी उडवीन. त्या वेळीं वानरांनीं भूभुःकारांनीं आकाशपाताळ एक करून टाकलें. असो.

मारुतीनें जेवढी लंका जाळली तेवढी सोन्याची झाली, ह्याचें कारण काय ह्मणून अतिवृद्ध जांबुवंत ह्यास रामचंद्रानें प्रश्न केला. तेव्हां तो ह्मणाला, लंकानगर वसण्याचे पूर्वीं तेथें जंबुवृक्षाची खांदी गरुडानें टाकली होती, तिला अग्निस्पर्श होतांच तें सोनें रसरूप होऊन मूस ओतल्याप्रमाणेंच त्याचीं सुवर्णाचीं घरें बनलीं. असो, मग विजयादशमीचा मुहूर्त पाहून रामचंद्र लंकेवर निघाले. तेव्हां मारुतीनें रामचंद्रास व अंगदानें लक्ष्मणास खांद्यावर घेतलें, आणि मग तें प्रचंड वानरसैन्य घेऊन भूभुःकार करीत सर्वजण समुद्रतीरीं येऊन पोंचले. दहा योजनें त्या सैन्याचा तळ पडला होता, त्याच्या गर्जनांनीं ब्रह्मांड कलकलून गेलें होतें. असा तो प्रचंड ध्वनि ऐकतांच रावणाच्या पोटांत जो धसका बसला, तो पुन्हा सांवरलाच नाहीं. त्यानें तात्काळ आपल्या प्रधान, सेनापति, मोठमोठे वीर ह्यांची सभा करून पुढें आतां काय विचार करावा, असें

विचारलें. तेव्हां प्रहस्त, देवांतक, नरांतक, इंद्रजितादिक समस्त पुत्र शस्त्रें सरसावून ह्मणाले, ह्याची एवढी काळजी ती कशाची? नरवानर हें आपलें भक्ष्य. तें देवानें आयतेंच आमचे घरीं पाठविलें. आतां खुशाल मौजेनें खाऊन चैन करूं. तेव्हां बिभीषण' ह्मणाला, रे मूर्खांनो, कां व्यर्थ रावणास थापा देऊन वेडा करीत आहांत. एकाच वानरानें येथें येऊन लक्षावधि सैन्याचा नाश केला, रावणासह तुह्मां सर्वांची त्यानें विटंबना केली, लंका जाळली, आणि तुमच्या उरावर दंड थापटीत आरडत गर्जत निघून गेला. केवढा एकट्यानें पुरुषार्थ केला तो पहा. तेव्हां तुमचें बल कोठें होतें? आणि आतां तर असे कोट्यवधि वानर येथें आले आहेत; त्यांचेपुढें तोंडही तुमच्यानें करवणार नाहीं! व्यर्थ बडबड करून तुह्मी रावणाचा नाश करूं इच्छित आहांत. असो, हे रावणराज, तूं मला वडील आहेस, मी तुला इतकीच विनंति करतों कीं, रामचंद्राचा पराक्रम सीतास्वयंवरीं तूं पाहिला आहेस, खर, दूषण, मारीच, सुबाहु, ताटका, शूर्पणखा ह्यांच्या परिणामावरूनही तुला रामाचा पराक्रम ठाऊक झाला आहे. आणखी तुला सांगतों कीं, तो साधारण नाहीं; तो ईश्वरांशी आहे. तुला बंदींत घाळणाऱ्या सहस्रार्जुनाचा नाश करणाऱ्या भार्गवरामाचा ही ज्यानें गर्व हरण केला, त्याला तूं मित्रच कर, सीता ही भेट घेऊन त्याला शरण जा, आणि चिरकाल पुत्रपौत्रांसह आनंदानें ह्या अवाढव्य संपत्तीचा उपभोग घे. तंट्याचा प्रसंग आणूं नको. मंदोदरीस दुष्ट स्वप्नें पडतात, लंकेंतही वारंवार उल्कापात होत आहेत, ह्यावरून परिणाम चांगला होणार नाहीं हें ध्यानांत आण. अशा प्रकारें बिभीषण बोलत असतां इतरांची तर त्याचे पुढें बोलण्याची छातीच होईना. परंतु रावण

बिभीषणाची निंदा करूं लागतांच सर्वांनीं एकच कल्लोळ केला. इतक्यांत कैकसीनें येऊन बिभीषणास ह्मटलें, रे तूं तरी रामचंद्रास शरण जाऊन माझें पुत्रवती हें नांव बहुतकाल चालव. ह्या चांडाळास घेऊंदे आपला सत्यनाश करून. तें ऐकून बिभीषण रावणास सांगूनसवरून आपल्या चौघां प्रधानांसह रामचंद्रास शरण जाण्यासाठीं तेथून उडाला.

## अध्याय तेविसावा.

### सेतुबंधन.

मग बिभीषण रामसैन्यापासून दूर उभा राहून सर्वांस आपली हकीगत सांगून रामचरणांच्या दर्शनाविषयीं सर्वांचीच विनवणी करूं लागला. परंतु तो रावणबंधु असें ऐकतांच कोणीच त्याची दाद लावीनात. शेवटीं मारुतीनें रामचंद्रास त्याचे गुण सांगून त्यास रामपायीं आणून पोंचविलें. मग रामचंद्रानेंही त्याचा खरा भाव पाहून त्यास चिरंजीव करून लंकेचा राजा करण्याची भाक देऊन तत्काळ अभिषेकही केला; त्या वेळीं मारुतीनें वाळूचें एक प्रचंड लंकानगर तयार केलें होतें. रामास त्याचें मोठेंच कौतुक वाटलें. असो. मग समुद्रावरून मार्ग मिळावा ह्मणून रामचंद्र तेथें कांठावर दर्भासन घालून समुद्राची पूजा करून तेथें निराहार बसले. ह्याप्रमाणें इकडले सारें वर्तमान शार्दूल नामा राक्षस हा रावणाचा हेर होता त्यानें रावणास कळविलें. तेव्हां रावणानें शुकनामें एका राक्षसास सुग्रीवाला फोडण्यासाठीं पाठविला. तो अंतरिक्षांत

उभा राहून सुग्रीवास ह्मणाला, मला रावणानें तुझ्याकडे पाठविलें आहे. तूं ह्या रामाच्या नादीं लागून कां व्यर्थ प्राणास मुकतोस? आमच्याशीं लढाईचा तुझा कांहीं संबंधच नाहीं. तूं आतां येथून बऱ्या बोलानें जाशील तर ठीक, नाहीं तर मीच तुह्मां साऱ्या मांकडांचीं शिरें खुडून नेतों. इतकें ह्मणतांच वानर चटकन् त्यास धरून खूपच मारूं लागले. शेवटीं लक्ष्मणानें त्याला सोडविलें. तरी तो पुन्हा आकाशांत उडून अचरटपणा करूं लागला, तेव्हां मग अंगदानें त्याला धरून त्याचे हातपाय बांधून त्यास वानरांच्या पाहऱ्यांत देऊन टाकलें. इकडे रामचंद्र तसेच तीन दिवस समुद्रकिनारीं बसले, परंतु त्यांची दाद लागेना. तेव्हां तत्काल रामानें धनुष्याला बाण जोडला. बाण कशाचा, तो केवळ प्रलयाग्निच. त्याच्या तापानें सारीं जलचरें आधींच घाबरलीं. तेव्हां समुद्र प्रत्यक्ष रूप धरून रामाचे पायीं लागून ह्मणाला, प्रभो, गर्जना करीत पडणें हा आपण माझा स्वभाव केला. त्याचा आपले आज्ञेवांचून मीं कसा बरें त्याग करावा? असो, मी आपला हा निकर पाहून आपणास शरण आलों आहें. तर कृपा करून आधीं हा बाण काढावा, आणि मग काय ती आज्ञा करावी. राम ह्मणाले; तें ठीक आहे, पण मी आपला बाण व्यर्थ काढणार नाहीं. तेव्हां मरु नामें दैत्य नेहमीं जलचरें खात असे, त्यावर तो बाण टाकण्यास समुद्रानें विनंति केली, तो मारवाडप्रांतीं त्या वेळीं होता. रामचंद्रानें बाणास त्याचा नाश करण्याची आज्ञा करून सोडून दिलें. तेव्हां त्या मरूचा तर नाश झालाच, पण एकंदर मारवाडप्रांताचें पाणी जें आटलें तें आटलेंच. असो. मग अमोल तेजस्वी अलंकारांनीं समुद्रानें रामलक्ष्मणांची पूजा केली. त्या वेळीं त्यांची फारच शोभा दिसूं लागून

सर्व वानर फारच आनंदानें नाचूं लागले. नंतर समुद्र ह्मणाला कीं, नळाचे हातून आपण सेतु बांधवावा, त्यानें पाण्यांत टाकलेले दगड बुडत नाहींत. कां कीं लहानपणीं तो एका ऋषीचे शालिग्राम नित्य नदींत टाकीत असे, तेव्हां त्यानें त्यास असाच शाप दिला होता; तर त्याचे हातून सेतु बांधावा, इतकें सांगून समुद्र गुप्त झाला.

मग तत्काळ वानरांकडून प्रचंड शिळा, पर्वत आणण्यास आरंभ होऊन नळ मोठ्या आनंदानें सेतु बांधूं लागला. पहिले दिवशीं त्यानें छप्पन्न कोस सेतु बांधला. तेव्हां त्यास अमळसा गर्व झाला. तों उजेडतां पाहतात तर सेतुच तेथें दिसेना. तेव्हां शोधाअंतीं असें समजलें कीं, एका माशाच्या पोरानें तो गिळून टाकला होता. शेवटीं रामाचे आज्ञेवरून तो माशानें जशाचा तसा ठेवून दिला. तरी नळाचा गर्व उतरेना. ह्मणून मग ते धोंडे नुसते तरत मात्र, परंतु एका ठिकाणीं स्थिर बसेनात. तेव्हां मारुतिरायानें ह्मटलें, नळा! तूं अभिमान सोडून दे. आणि एका धोंड्यावर रा व एकावर म अशीं अक्षरें लिहून मध्यें रेघ देऊन धोंडे पाण्यांत सोड. ह्मणजे ते स्थिर होतील. अरे! ज्या रामचंद्रानें खांबावांचून आकाश उभविलें; समुद्रावर ही पृथ्वी तारली, तो काय करणार नाहीं? तस्मात् निरभिमानी होऊन त्याची कृपा संपादन कर. त्याप्रमाणें मग नळानें करतांच दगड कायम ठरूं लागून सहा दिवसांतच चारशें कोसांचा सेतु तयार झाला. नंतर रामचरणानें सेतूच्या शिळेच्या स्त्रिया बनून वानरांच्या गळ्यांत पडतील अशा समजुतीनें रामलक्ष्मणांस मारुतिअंगदांनीं स्कंधावर घेतलें. आणि मग मोठ्या आनंदानें तें वानरसैन्य लंकेच्या रानांत येऊन उतरलें. नंतर शुकाला रामचंद्रानें सोडून दिलें. त्यानें रावणाकडे जाऊन रामाचा पराक्-

मच वर्णिला. तेव्हां 'तूं मार खाल्लास ह्मणून असें बोलतोस, तर आतां तूं व सारण दोघे जाऊन सर्व कांहीं तपास करून या ह्मणून रावणानें त्यांस सांगितलें. त्याप्रमाणें ते दोघे वानरवेष घेऊन रामसैन्यांतून हिंडत असतां बिभीषणानें त्यांस ओळखून रामास सांगितलें. तेव्हां रामानें त्यांस धरून आणून सर्व कांहीं प्रकार दाखवून त्यांस लावून दिलें. तेव्हां रावण त्या दोघांस बरोबर घेऊन आपल्या सोळा मजले उंच अशा महालाच्या गच्चीवरून ते जें दाखवीत तें तें पहात होता. त्याचें छत्र इतकें विशाळ होतें कीं, सर्व रामसैन्य त्याच्या सांवलींत आटून गेलें होतें. अशा थाटानें तो रामसैन्य अवलोकन करीत व आपलें वैभवही रामचंद्रास दाखवीत होता. तेव्हां वानर तर कावरेबावरेच झाले, इतक्यांत लक्ष्मणानें कल्पांतविद्युल्लतेसारखा एकच बाण टाकून त्याचें मुकुट, छत्र, चामर आदि पार छेदून उडवून दिलें. तेणेंकरून रावण अगदीं घाबरा होऊन धूम घरांत गेला. त्याला इतकें कांहीं विलक्षण भय वाटलें कीं, अन्नपाणीही त्यास गोड लागेना. कपाळशूलानें तो व्याघ्रवतच आरंबळत पडला.

---

## अध्याय चोविसावा.

### रावण कपटेंकरून सीतेस मोहूं पाहतो.

रावण अशा प्रकारें दुःखांत निमग्न झाला. तेव्हां प्रहस्त, विद्युज्जिव्ह, वज्रदंष्ट्री आदिकरून प्रधानमंडळी त्याचें समाधान करीत असतां तो ह्मणाला, माझे मुख्य हेतु दोन, एक रामलक्ष्मणांस ठार

मारणें आणि दुसरा सीतेचा उपभोग घेणें. ते साधले तरच आतां माझ्या मनाला समाधान आहे. मीं सीतेवर सहज बलात्कार केला असता, परंतु तसें केलें तर माझ्या शरीराचे तुकडे उडतील असा मला ब्रह्मदेवाचा शाप आहे. तेणेंकरून नखदंतहीन व्याघ्राप्रमाणेंच मी दीन झालों आहें, तर ती मला वशच झाली पाहिजे. विद्युज्जिव्ह हा मोठा मायावी होता. तो ह्मणाला, मी हुबेहुब रामाचें शिर व धनुष्य तयार करतों. तें ऐकून रावण ह्मणाला, वाः फार नामी कल्पना, माझ्या प्राणमित्रा! तर मी पण आपला एक तर मनोरथ साधतोंच, हा मी अशोकवनांत जातों, तूं तीं दोन्ही तेथें घेऊन ये. ह्याप्रमाणें बोलून सीतेकडे जाऊन ह्मणूं लागला, झालें, तूं येवढें धैर्य धरलेंस परंतु सारें व्यर्थ गेलें. आमच्या प्रहस्त प्रधानानें रातोरात घाला घालून पहिल्या सपाट्यांत नळ, नीळ, अंगद, जांबुवंत, सुग्रीव, हनुमंत बिभीषण व रामचंद्र इतक्यांचीं शिरें तर त्यानें कापलींच, लक्ष्मण मात्र चुकून अयोध्येकडे पळून गेला, इतक्यांत सेतुही प्रहस्तानें पाडला, त्यामुळें वानर अनायासेंच आह्मांला सांपडून ठार झाले, आतांच तुला ह्याचा प्रत्यय येईल. इतकें तो ह्मणत आहे तोंच विद्युज्जिव्हानें (मायावी) रामशिर व धनुष्य तेथें आणून ठेवलें, तें पाहतांच सीता शोकवेग आंवरून ह्मणाली, रावणा, तूं मला जनकासारखा आहेस, तर आतां ह्या शिरासह सती जाण्याची माझी तयारी कर.' तें ऐकून तो चोरटा मुकाट्याच तेथून उठून गेला. तेणेंकरून सीता पराकाष्ठेचा शोक करूं लागली. तेव्हां बिभीषणपत्नी सरमा हिनें तिला तें राक्षसी कपट जाणवून तिचा मोह दूर केला.' तों तें शिर व धनुष्य हीं एकाएकीं गुप्त झालीं. व देववाणीनें राम सुखरूप आहे असें सीतेस कळविलें. तेव्हां 'तुला मी

लंकेची राणी करीन ' असें सीतादेवीनेंही सरमेस वचन दिलें. मग दोघीही परम संतोष पावून बसल्या.

इकडे रावणानें मंदोदरीस सांगितलें कीं, कसेंही करून तूं सीता मला वश करून दे. मंदोदरी सत्त्वानें फारच उत्तम असून महापतिव्रता होती. रावणानें देवादिकांचाही उपमर्द केला, परंतु मंदोदरीचा तो कधींच अपमान करीत नसे. असो, रावणाचे आज्ञेवरून मंदोदरी सीतेकडे आली. येतांच तिनें सीतेचे चरणीं मस्तक ठेविलें, सीतेनें तिला उचलून हृदयीं धरलें, तेव्हां त्या लक्ष्मीपार्वतीच एकत्र झाल्या असें वाटलें. असो, मग मयजेनें आपला हेतु सीतेला कळविला. तेव्हां दोघींचेंही परब्रह्मरूपाविषयीं बहुत बोलणें होऊन मंदोदरी मुकाट्याच परत येऊन रावणास सीतारूप उपायन घेऊन रामचंद्रास भेटण्याविषयीं बोध करूं लागली. तेव्हां तो ह्मणाला, प्रिये, तुझें भाषण मला फार आवडतें, परंतु आपला पुरुषार्थ टाकणें हें मला ठीक वाटत नाहीं. काय त्या चिरंजीवपणास करावयाचें आहे, रघुनंदन आदिपुरुष हें मी जाणतों, तो युद्धाचे हेतूनें एवढ्या प्रयत्नानें येथें आला आहे, तर आतां काय त्याची वासना पुरवूं नको? मी एक त्याला जिंकीन किंवा त्याचे हातून पंचत्व पावेन! असें बोलून तो पुन्हा गोपुरावर चढून रामसैन्य पाहूं लागला. त्या वेळीं सुग्रीवानें फारच अद्भुत कर्म केलें. एकाएकीं तो बसल्याठिकाणाहून उडून रावणाजवळ येऊन त्याचे मुकुट, छत्र, चामरें; मोडून लाथाबुक्यांखालीं खूपच त्याला ठेंचलें. नंतर दोन घटका दोघांचें मल्लयुद्धही खूप जुंपलें. मग न जाणों, वालीप्रमाणें ह्याही आपणांस धरून रामाकडे नेऊन आपली विटंबना करील ह्या हेतूनें पळण्यास मार्ग सांपडेना ह्मणून सोळाव्या मजल्यावरून खालीं उडी

टाकली, त्यामागेंच सुग्रीवानेंही उडी टाकली. तेणेंकरून लंका-नगर डळमळून गेलें. असो, रावण अति घाबरून कोणीकडेच पळून गेला, आणि सुग्रीवही परत आपले स्थानीं गेला. तेव्हां राम ह्मणाले, जवळ सेवकजन असतां राजानें एकाएकीं असें साहस करूं नये. असो, मग रामचंद्र सभा करून पुढें आतां काय मार्ग करावा ह्याचा विचार करीत बसले. तेव्हां प्रथमतः शिष्टाई करून मग जें काय होईल तें करावें असा विचार ठरून शिष्टाईस यथायोग्य पुरुष वालिपुत्र अंगद हा सर्वांनीं पसंत केला. तो खराच योग्य होता. बोलण्यांत चतुर, सर्व शास्त्रें जाणता, शूरही तसाच, प्रसंग आलाच तर मार खाऊन यायचा नाहीं. तर मार देऊन येणारा असा तो होता. तेव्हां रामानें त्याला शिष्टाईसाठीं पाठविलें. तेव्हां तो चटकन् उडून निःशंक रावणसभेंत येऊन पोंचला. त्याला पाहतांच सर्वजण भ्याले, कां कीं, एकदां एकट्यानेंच लंका जाळली, एकदां एकट्यानेंच रावणाची खूपच विटंबना केली, आणि आतां हा तिसरा आला, हा आतां काय करतो कोण जाणे ? ह्मणून कोणी काहींच बोलेना, तेव्हां तो स्वतःच रावणापासूनही उंच असें शेंपटाचेंच सिंहासन करून त्यावर बसून ह्मणाला ! रे मूर्खांनो, मी परठिकाणाहून आलों असतां नुसती विचारपूसही कराना. रावणा, तूंही त्या मूर्खांचा राजा, तेव्हां तूं तर शतमूर्खच आहेस, असो. मी श्रीरामाचा दूत आहें, मी तुझ्याशीं शिष्टाई करण्यासाठीं आलों आहें समजलास, नीट ऐक आतां माझें भाषण.

# अध्याय पंचविसावा.



## अंगदशिष्टाई, युद्धारंभ.

अंगदानें आपण कोण, येण्याचें कारण काय वगैरे सांगितल्यामुळें सभा अगदीं गुपचूप बसून टकटक त्याचे तोंडाकडे पाहूं लागले. तेव्हां कोणी न विचारतां अंगदच बोलूं लागला कीं:—रावणा! नरदेह प्राप्त झाला असतां कीर्ति गाजवावी, निंदा हेलना कोणाची करूं नये, कामक्रोधादि शत्रु जिंकावेत, अभिमान झाडावा, मनोजय करून ईश्वरभजनीं काल घालवावा, परधन, परदारा ह्यांचा अभिलाष सोडून यथान्याय राज्य चालवावें. भाग्यकालीं गर्व करूं नये, विपत्कालीं धैर्य सोडूं नये. असो, रावणा, मी तुला फार योग्य मार्ग सांगतों. तूं अयोध्याधीश रामचंद्राची मैत्री कर, त्यास एक मानवी राजा असें समजूं नको, तो परमेश्वर, त्रैलोक्याचा स्वामी आहे. शत्रु शरण येतांच तो त्याचे अन्याय विसरून त्याचेवर पूर्ण कृपा करणारा आहे, तरी सीता त्याची त्यास देऊन चंद्रसूर्य आहेत तोंपर्यंत आनंदानें राज्य कर. कोट्यवधि अपराध करूनही कोणी रामाला शरण आला तरी तो त्यावर कृपा करील, मग एका अपराधाची गोष्ट ती काय? तूं शहाणा आहेस, तूं वेदाचीं खंडें केलींस, तस्मात् तूं श्रीरामास आपला सखा कर. ह्याप्रमाणें अंगद बोलत असतां रावण गर्वानें ह्मणाला, रे पालेखाऊ माकडा! तुझा बाप रे कोण! तेव्हां अंगदही त्वेषानें ह्मणाला, रे! ज्यानें तुला कांखेस मारून चतुःसमुद्रांची यात्रा केली, व शेवटीं ज्याच्या पुत्राचे पाळण्यावर बांधलें, आणि मग तुझ्या बापानें भिक्षा मागि-

तल्यामुळें तुझ्या तोंडास काळें लावून तुला लंकेंत झोंकून देणाऱ्या महाप्रतापी वानरवीर वालीचा मी पुत्र आहें, माझें नांव अंगद, मी रोज़ तुझ्या दाढ्यामिशा ओढून तुझ्या तोंडांत मूत्र उडवीत होतों. तोच मी अंगद बरें का. आणखी शिवकोदंडापासून तुझे प्राण वांचविणाऱ्या महापराक्रमी अयोध्याधीश रघुपतीचा मी दूत आहें, ज्यानें ताटका, मारीच, सुबाहु, त्रिशिर, दूषण, खर ह्यांचा पत्ता मोडला. ज्याची बायको तो आश्रमांत नसतां तूं चोराप्रमाणें घेऊन आलास त्याचा मी दूत आहें. त्या तुझा चोराचा माग लावीत तो भगवान् रामचंद्र येथें आला आहे, तुझें आयुष्य संपलें ह्मणून समज. अझून तुला उमजायचें असेल तर उमज. तेव्हां वानर फारच संतापानें ह्मणाला, रे माकडा, तूं बोलतोस काय? अरे सर्व देव माझे बंदेचाकर असून धांवधांवून काम करितात, एक वानर चोरासारखा येऊन त्यानें चोरट्याप्रमाणें अशोकवन मोडलें, पुन्हा तो दृष्टीस पडूंदे कीं त्याला ठारच करतों. अंगद ह्मणाला, जारे घुंगरड्या, तो चोरासारखा आला काय? त्यानें तुझीं सात कार्टीं तर ठार केलीं, लंका जाळली, तेव्हां तुझें सामर्थ्य कोठें होतें? थांबरे मुर्दाडा, सीतादेवीपुढें तुझा दहा तोंडाच्या बोकडाचा होम होईल बरें. घाबरूं नको. रावण ह्मणाला, जारे तूं जन्मून भूमीला भार मात्र झालास, अरे नीचा, प्रत्यक्ष तुझ्या बापास ठार करून ज्यानें चुलत्याचे स्वाधीन तुझी आई केली, त्याचा तूं दूत होतोस, हा रे जारिणीपुत्रा! तुझ्याच्यानें बापाचा सूड घेववत नाहीं? तूं माझे पाठीशीं ती ये, ह्मणजे मी सुग्रीवास ठार करून तुलाच राजा करितों. राम, सुग्रीव दोघेही तुझे परम शत्रु होत. अंगद ह्मणाला; जारे मूर्खा, वाली तर रामबाणानें मुक्तच झाला. तुझें सा-

मर्थ्य तुला ठावकें नाहीं काय? बलीचे राज्यांत तुला तर बायकांनीं ठेंचलें, ठाऊक आहेना. तें ऐकतांच रावण तरवार उगारून ह्मणाला, धरारे याला आधीं, असें ह्मणतांच चौघे राक्षस अंगदाचे अंगावर धांवले, आणि त्यांनीं अंगदाचे दोन्ही दंड धरले. तेव्हां अंगदानें फारच अघटित कर्म केलें. त्यानें अशी एक गर्जना केली कीं, काळही घाबरला, मग रावणसभेची कथा काय? असो मग शेंपटाचा एक तडाका रावणाच्या उरांत मारून त्याचा मुकुट घेऊन त्या प्रचंड मंडपाच्या शिखरावर स्वारी आली. आणि एवढा तो छप्पन्न कोस विस्तीर्ण बंगला पण त्याचे भोंवतीं शेंपटाचे गरके घालून चटकन् तो उचलून आपल्या सैन्यांत जाऊन पोंचला. ज्या चौघां राक्षसांनीं त्यास धरलें होतें, त्यांचीं तर प्रेतें होऊन पडवळासारखे ते लोंबत होते, त्यांना तेथें टाकून देऊन रावणाचा मुकुट श्रीरामापुढें ठेवला. तो प्रभूनें बिभीषणाचे मस्तकीं घालून अंगदास हृदयीं धरून ह्मटलें, शाबास, केवढा हा तुझा पराक्रम! असो. पण हा मंडप येथें आणलास, तर आतां बिभीषणानें पुढें कोठें बसावें? तें ऐकून अंगद पुन्हा तो मंडप जेथचा तेथें ठेवून परत आला. तेव्हां राक्षसांस परम आश्चर्य वाटून गेलें! असो. इकडे अंगदानें सभेंत झालेला कच्चा मजकूर रामचरणीं सादर केला. तेव्हां आतां युद्ध करणें भाग असें जाणून प्रभूनें आपल्या धनुष्याची गवसणी काढली, तेव्हां विद्युल्लतेप्रमाणें ती धनुर्लता चमकूं लागली! मग सुग्रीवानें प्रचंड गर्जना करून सैन्य सावध केलें. आणि मग रीसवानर एकदम भूभुःकार देत तयार झाले, त्या त्यांच्या गर्जनांनीं दिग्गजांच्या कानठळ्या बसल्या, आकाशपाताळ धुरोळ्यानें एक होऊन गेलें! मेरुमांदारासारखे पर्वतही कांपूं लागले.

आणि एकदम सर्वजण लंकादुर्गाला झोंबले. सर्वांच्या पुढें मारुतिराय! लंकेचे बुरूजही गगनापर्यंत उंच गेले होते, व त्यांवर अनेक शस्त्रें ठेवलीं होतीं, व तेथें वीरही बहुत होते, त्यांनीं तत्काळ वानरांवर मारा सुरू केला. वानर काय पाहिजे तशा उड्या मारणारे, हांहां ह्मणतां ते लंकेंत शिरले, आणि मग कोणाचीं पोटें फाड तर कोणाचे हातपाय तोड, ह्याप्रमाणें गर्दी करून भडाभड राक्षसांस जमिनीवर आदळून खंदकांत फेंकून देऊं लागले, असा त्यांनीं मोठा प्रलय मांडला. तेव्हां रावणानें प्रचंड सैन्य त्यांचेवर पाठविलें. तें राक्षससैन्यही परम भयंकर, त्यांचीं शस्त्रेंही तशींच भयंकर. अशा प्रकारें तें सैन्य येतांच दोन्ही सैन्यें एकवटून भयंकर लढाई चालू झाली. वीरांच्या आरोळ्या, दणदणाट, आणि रणवाद्यें ह्यांनीं दशदिशा कलकलून गेल्या. वानरांनीं धोंडे, वृक्ष, पर्वत ह्यांचा मारा चालविला. शिवाय शत्रूचे हत्तीच दुसऱ्या हत्तींवर फेंकून दोघांचेही प्राण घेत चालले. तेणेंकरून राक्षससैन्य जर्जर झालें, असें पाहून धूम्राक्ष वीर पुढें होऊन त्यानें हांहां ह्मणतां तीन लाख वानर पाडले. त्या एकट्यावर शिलापर्वतांचा वानर एकसारखा तीन अहोरात्र वर्षाव करीत होते, परंतु तो कांहीं केल्या आवरेना! शेवटीं मारुतीनें तिसरे दिवशीं त्याला ठार केलें. नंतर वज्रदंष्ट्री युद्धास आला. त्यानें बहुत वानरवीर पाडले. शेवटीं अंगदानें त्याला ठार केलें. नंतर अकंपनवीर आला त्याला मारुतीनें निकालास लाविलें. ह्या सर्व गोष्टी रावणाच्या कानावर जातांच तो अगदींच शोकाक्रांत होऊन गेला. तेव्हां इंद्रजित प्रतिज्ञा करून युद्धास आला. त्याचे बरोबर जंबुमाळी, विद्युन्माळी असे महाप्रतापी वीर होते, परंतु हनुमंत व सुषेण ह्यांनीं ते दोघेही टणका-

वले. तेव्हां इंद्रजितास परम क्रोध येऊन तो मेघमंडळाआड जाऊन तेथून सर्पशस्त्रानें अभिमंत्रित असे बाण सोडूं लागला. तेणेंकरून सारें रामसैन्य अचेतन पडलें, रामलक्ष्मणांचीही तीच अवस्था झाली. ह्याप्रमाणें पराक्रम गाजवून तो कितीएक मुख्य मुख्य वानरांचीं प्रेतें लंकेंत घेऊन गेला. तेणेंकरून रावणास परम आनंद झाला, व त्यानें त्रिजटेस सांगितलें कीं, सीतेस विमानांत बसवून एकदां साऱ्या सैन्याची हालहवाल दाखीव. त्याप्रमाणें विमानांतून सीतामायी हें विपरीत पाहतांच शोकाक्रांत झाल्या. रामलक्ष्मण अगदीं अचेतनच पडले होते, जळवेप्रमाणें त्यांचीं अंगें सर्पांनीं वेढून धरलीं होतीं, तें पाहून जानकीनें तर फारच आकांत मांडला. परंतु सरमा व त्रिजटा ह्यांनीं तिचें समाधान करून ह्मटलें कीं, आतां सर्व सैन्य सावध होईल, न होईल तर आमचीं शिरें झडोत, ह्याप्रमाणें बोलून तिला परत अशोकवनीं नेऊन ठेवलें.

इकडे बिभीषणानें आधीं राक्षस रातोरात रामलक्ष्मणांवर पर्वत वगैरे टाकतील ह्या भयानें सुग्रीवाकडून वानरपुच्छांचा त्यांवर मंडप करविला. नंतर बिभीषण व हनुमान् सर्व सैन्य शोधीत चालले. जिकडे तिकडे सारेच वानर प्रेतवत् पडत चालले होते. सुषेण जांबुवंतांचीही तीच गति. नागपाशांनीं ते अगदीं वेढून गेले होते, तरी ह्यांना पाहून सुषेण ह्मणाला, द्रोणाचलावरील अमृतवल्ली जर कोणी बलाढ्य पुरुष आणील तर आतांच सारें सैन्य जिवंत होईल. सुग्रीव ह्मणाला, गड्यांनो! आतां तें सारें असो, पण आधीं रामलक्ष्मणांस घेऊन तुह्मी किष्किंधेस जाऊन काय तें करा, इतक्यांत मी रावणास ठार करून बिभीषणास राज्यावर बसवून हा आतांच परत येतों.

असा ह्यांचा इकडे विचार चालू आहे तोंच ‘ राम आपल्या सै-

त्यासह आतां सावध होतील, अशी आकाशवाणी झाली. आणि वायूनें गरुडमंत्र जपण्याविषयीं रामकर्णीं सूचनाही दिली. त्याप्रमाणें गरुडमंत्राचा जप करतांच प्रत्यक्ष गरुड तेथें आला. मग तेथें सर्प कोठंचा ठरतो, सर्व सर्प नष्ट होऊन पूर्ववत् सैन्य सावध झालें. मग वानरांस परत आवेश प्राप्त होऊन लंका आज पालथी घालूं असें ते बोलूं लागले. रामही धनुष्य सिद्ध करून शत्रूची वाट पहात राहिले.



# युद्धकांडप्रारंभः

## अध्याय सत्विसावा.

---

### प्रहस्तवध व रावणपराजय.

रामसैन्य युद्धाविषयीं अगदीं उतावळें होऊन गेलें होतें; उजाडलें नाहीं तोंच वृक्षपाषाण लंकेंत भिरकावीत व तेथील घरादारांचा चुराडा करीत लंकादुर्गाला झोंबलें. हें वर्तमान रावणाचे कानीं जातांच त्याला मोठेंच आश्चर्य वाटलें, कां कीं आदले रात्रीं रामलक्ष्मणांसह सारें सैन्य पडलें होतें असें त्यानें ऐकलें व पाहिलें होतें. असो. मग त्यानें प्रहस्त प्रधानास रवाना केलें. हा महाप्रतापी वीर, रावणाच्या पूर्ण खात्रीचा, देवयुद्धांत कधींच अपयश न पावलेला निवडक वीरांचें प्रचंड सैन्य घेऊन महाद्वारांतून बाहेर पडतांच त्याच्या रथावर रक्तानें भरलेला एक वीराचा बाहु गिधाडानें टाकला. हा त्याला जरी अपशकुन झाला तरी वीरश्रीनें तो मागें फिरला नाहीं. तसाच ससैन्य रणभूमीस येऊन युद्ध करूं लागला. तत्काल उभयसैन्य एकवटून मारामार सुरू झाली, प्रहस्ताच्या माररापुढें वानरांचा टिकाव लागेना, तेव्हां नीळ जो रामाचा मुख्य सेनापति तो पुढें सरला; आणि उभयतांचें तुंबळयुद्ध जुंपलें. प्रथमतः प्रहस्तानें नीळासही अगदींच घाबरें केलें, परंतु नीळानें प्रचंड ताडवृक्षाचा एकच घाव मारून रथासहित प्रहस्ताचा चेंदा करून टाकला. हें वर्तमान रावणास कळतांच मग मात्र त्याचे

डोळे चटकन् उघडले. आणि आतां खचित विपरीत काळ आला असें त्याला वाटूं लागलें. तरी पुन्हा वीरश्रीनें भरून स्वतांच युद्धाला निघण्याची त्यानें तयारी करून आपलें जें काय मुख्य सैन्य त्यास सुचविण्यासाठीं भेरी ठोकल्या. हें वर्तमान मंदोदरीच्या हेरांनीं तिला कळवितांच ती रावणाकडे आली. ती सभेंत येतांच सारे सभासद खालीं माना घालून तेथून दूर गेले. रावणापेक्षांही लोक तिला अधिक मान देत होते, प्रत्यक्ष रावणही तिचा मान ठेवीत होता, व तीही अशा मानाला पात्र होती. अशी ती मंदोदरी रावणास नमस्कार करून हात जोडून तेथें उभी राहिली. तेव्हां रावण ह्मणाला, ह्या वेळीं आपलें येणें कां बरें झालें? या, बसा येथें. मग ती क्षणमात्र शांत बसून ह्मणाली, एवढीच विनंति आहे कीं, सुमार्ग सोडून वागणारास संकटें प्राप्त होणारच, पुरुषांचा पुरुषार्थ खरा हाच कीं परदारा व परधन यांची इच्छा न करणें ह्यामार्टी. अहो लंकानाथा! कामाला थारा आपण देऊं नये, कामशत्रु जो शंकर त्याचा मित्र जो श्रीराम ह्याशीं आपण सख्य करा. कार्तवीर्यास मारणाऱ्या परशुरामास ज्यानें हटविलें तो राम समर्थ नाहीं काय? तस्मात् प्रल्हादानें जसा तो आपलासा केला तसाच आपणही तो आपलासा करावा. असें ती बोलत असतां रावण ह्मणाला, आपण ह्मणतां हें उत्तम आहे, परंतु मी पुरुषार्थी आहें; मी रामाशीं कधीं सख्य करणार नाहीं. पहा मी आतांच जाऊन रामलक्ष्मणांसह सर्वांचा नाश करून येतों, ऐकाल माझा पराक्रम, तर आतां आपण आपल्या मंदिरीं जावें. असें त्याचें भाषण ऐकून ती बिचारी मुकाट्यानेंच तेथून गेली, तिला कांहींच गोड वाटेना! सुखशय्या,

अलंकार वगैरे सर्व तिनें टाकून दिलीं. आणि चिंतासागरीं निमग्न होऊन पडली.

इकडे संग्रामभेरींचे प्रचंड नाद सुरू झाले, लंकेचीं सर्वच महाद्वारें खुलीं केलीं, आणि पुत्र, नातू, सर्व प्रधान ह्यांसह रावण रणमंडळीं येऊन पोंचला. नानारंगांचे घोडे, हत्ती, रथ ह्यांनीं तें सैन्य गच्च भरून गेलें होतें. वीरांचीं शस्त्रें, पोषाकही विलक्षण. फारच तें प्रचंड सैन्य, त्यांच्या चालण्यानेंच पृथ्वी डळमळूं लागली. बिभीषणानें रावणाचे पुत्र, प्रधान वगैरे सर्व रामचंद्रास दाखविले. रावणाचा रथ फारच तेजस्वी होता; तो ब्रह्मदेवानें स्वतः तयार केला होता, सहस्र सूर्यांप्रमाणें त्याची कांति होती, असा दुसरा रथ नव्हताच! अशा प्रकारें तें सैन्य येतांच सुग्रीवानें एकदम रावणावर मारा केला, दुसरेही कैक वानर रावणावर वृक्षपर्वत टाकूं लागले, परंतु एकही घाव रावणास बसला नाहीं. त्यानें बाणेंकरून वृक्षपर्वत निवारून जबरदस्त मारा करून वानरवीर जर्जर केले. तें पाहून रामचंद्र पुढें सरसावले. तेव्हां लक्ष्मण आज्ञा घेऊन पुढें लोटला. आणि दोघांचें भयंकर युद्ध जुंपलें. ते दोघेही प्रचंड योद्धे, कोणीच कोणास ऐकेना, तरी रावणानें एक शक्ति टाकून लक्ष्मणास मूर्च्छित पाडून रथांतून उतरून एक लाथ मारली, तेव्हां मारुतीनें धांवून लाथ मारून रावणास मूर्छित केलें, लागलाच लक्ष्मणही सावध होऊन धांवला, तों रावण सावध होऊन युद्ध करूं लागला. नळानें तर आपणासारखे शेंकडों नळच उत्पन्न केले. अशा प्रकारें मोठेंच प्रचंड युद्ध चालू झालें. ह्या वेळीं रावणाची अमळ सरशी पाहून हनुमंताच्या स्कंधावर बसून रामचंद्र पुढें सरसावले. आणि मग विशेष युद्ध न करतां एकच बाण टाकून रावणाचीं छत्रें,

चामरें, दहा मुकुट, दहा धनुष्यें व दहा भाते इतकीं छेदून टाकिलीं. तेणेंकरून रावण फारच घाबरा झाला. त्याला वाटलें आलीच आपली वेळ, त्यामुळें त्याला कांहींच सुचेनासें झालें. तेव्हां राम ह्मणाले, घाबरूं नको, आज तुला सोडून देतों. जा तूं आतां, घरीं दोन दिवस सर्व संपत्ति भोग, बायकांचें मन शांत कर, आणि पुत्रपौत्र, आप्त ह्या सर्वांचा निरोप घेऊन ये. मग मी रणांगणीं तुझ्या शरीराचे तुकडे उडवीन, असा माझा संकेत आहे, जा तूं आतां. एवढे वीर तुझ्या पदरीं असून तूं रे कशाला इतक्यांत युद्धाला आलास! हा मूर्खा! निघ, तोंड नको दाखवूं. तें ऐकून रावण गर्वहत होऊन मुकाट्यानेंच मागें फिरला.

---

## अध्याय सत्ताविसावा.

### कुंभकर्णवध.

रामानें पराजय केल्यावेळापासून रावणास कांहींच गोड लागेना. तो अगदीं काळवंडून गेला, व छत्रसिंहासन एकीकडे टाकून जमिनीवर लोळतच पडला. तेव्हां त्याचे प्रधान ह्मणाले, काळ तर विपरीत दिसतो खरा, पण जर कुंभकर्णास उठविलें तर रामलक्ष्मणांसह हें सारें सैन्य त्याच्या एका भुकेसही पुरणार नाहीं. तेव्हां रावणानेंही त्यांना अनुमोदन दिलें. मग विरूपाक्ष व महोदर हे मुख्य प्रधान दहा लाख राक्षस घेऊन कुंभकर्णाकडे गेले, चार हजार दारूच्या पखाला हत्तींवर घालून व पुष्कळच अन्नाचे आणि मांसाचे ढीग त्यांचे बरोबर होते. तो राक्षसच प्रचंड, गव्वा लक्ष

योजनें समुद्राचें पाणी खोल आहे, परंतु तें त्याच्या बेंबीपर्यंत लागत असे. जन्मतःच त्यानें तीस हजार बायका गट्ट केल्या होत्या. तो एका प्रचंड आवारांत पडला होता. तेथें जाऊन शंकराची समाधिसुद्धा भंग पावेल अशा घोर आरोळ्या सर्वांनीं ठोकल्या. प्रचंड झाडें त्याच्या नाकांत कानांत घालूं लागले, राक्षस व हत्ती हे त्याच्या शरीरावरून नाचूं लागले. कडू तीक्ष्ण औषधांचे पर्वतचे पर्वत त्याच्या नाकांत रिचविले, पण कांहीं नाहीं. मग किन्नरींस त्याचे कानांत बसवून गायन चालविलें, तेव्हां स्वारी जागी होऊन जांभई देऊन उठून बसली. तोंच सार्‍या मद्याच्या पखाली त्याच्या तोंडांत लोकांनीं रिचवल्या, लाखों जनावरें दाढेखालीं रगडलीं, अन्नाचे पर्वत खाल्ले व झपाट्यासरसे कितीएक राक्षसही बेट्यानें मटकावले. आणि मग स्वारी डोळे पुसून हुशार होऊन चोंहींकडे पाहूं लागली. तेव्हां प्रधानांनीं नमस्कारपूर्वक सर्व कांहीं मजकूर त्याचे कानीं सांगितला तें ऐकून तडकन् उभा राहून हा असाच युद्धास जातों, असें बोलून निघाला. तेव्हां रावण फार घाबरला आहे तर आधीं त्याला भेटा आणि मग जा असें प्रधानानें ह्मणतांच स्वारी तिकडेच निघाली. एवढा लंकेचा कोट पण तो ज्याला घोट्याएवढाही होईना, असा तो वीरपुरुष निद्रावश झाला ह्मणूनच त्रैलोक्य टिकलें, नाहीं तर त्याच्या नुसत्या भुकेपायींच सारें विश्व आटलें असतें. तो चालत असतां सहज देवांचीं विमानें धरणारा, ह्मणून देव धूम पळाले. देवांची जेथें अशी धांदल उडाली, तेथें वानरांचा काय पाड, त्यांना तर लंकादुर्गांतून हें प्रचंड धूड दिसतां थंडीच भरली. कितीएक धूम पळून गिरिकंदरीं जाऊन दडाले. असें पाहून रामचंद्रानें मारुतीस डोळा घातला. त्याबरोबर

हनुमंतानें चटकन् कुंभकर्णाच्या कंबरेस कव घालून उचलून त्यास गरगर फिरवून दाट वृक्षाच्या राईंत फेंकून दिलें. कुंभकर्ण मद्यानें गुंग झाल्यामुळें त्यास हें कांहींच कळलें नाहीं, परंतु राक्षस व वानर अगदीं थक्क होऊन गेले. वानरांस मग चांगलेंच धैर्य येऊन ते आनंदानें मारुतिरायाचा गौरव करूं लागले. इकडे कुंभकर्ण तसाच धडपडत उठून झुकत झुकत रावणसभेंत गेला व तुजवर संकट काय आलें ह्मणून रावणास विचारूं लागला. कुंभकर्णाचें तें घोरायमान भाषण, अवाढव्य शरीर, आणि तदनुरूप त्याचा पराक्रम ध्यानांत घेऊन आतां मात्र आपण विजयी झालोंच असें मानून रावणानें त्यास सविस्तर वर्तमान सांगितलें. तेव्हां कुंभकर्ण ह्मणाला राम हा वैकुंठवासी भगवान् आहे व वानर देवांशी आहेत असें नारदानें एकदां मला सांगितलें होतें. तेव्हां त्याच्याशीं तूं वैर केलेंस ही गोष्ट चुकीची झाली. सीता रामावांचून कोणालाच वश नाहीं, तस्मात् ह्याचा परिणाम काय होईल हें मी जाणतों. बरें पण रावणा! तिला तूं भोगलेंस तरी. तो ह्मणाला तेंही घडलें नाहीं. कुंभकर्ण ह्मणाला तर मग कापट्यमंत्रानें रामरूप धरून एकदां उपभोग तरी घे. मग जें व्हावयाचें तें होनच आहे. तो ह्मणाला तसें करायला गेलों कीं, एकपत्नी, एकवाणी एकवृत्ति रहावें असेंच वाटतें. ह्यासाठीं हे बांधवा रामलक्ष्मणांचा निकाल उडाला तरच हा कार्यभाग साधेल. तें ऐकून कुंभकर्ण ह्मणाला, आतांच सारें सैन्य मटकावून रामलक्ष्मणांस धरून आणतों. असें बोलून स्वारी तेथून निघाली. रावणानें त्याचेबरोबर सैन्यही पुष्कळ पाठविलें, व आतां मात्र माझी हौस खास पूर्ण होईल ह्मणून सीतेस आपलें ऐश्वर्य दाखविण्यासाठीं नटत बसला.

इकडे कुंभकर्ण रणभूमीवर येतांच वानर धूम पळत सुटले. त्यानें तर दहा दहा पांच पांच गोळा करून तोंडांत टाकण्यासच आरंभ केला. असंख्यात वानर त्याचे अंगावर पर्वत, दगड, वृक्ष ह्यांचा माराही करूं लागले, परंतु जसा केरकचरा अंगावर येतो असेंच त्याला वाटून वानरें खाण्याचा त्याचा क्रम चालूच होता. त्याच्या तोंडांत जीं वानरें जात त्यांतून कितीएक तर नाकाकानांतून धूम उड्या टाकून पळून जात. असा कांहीं त्यानें भयंकर प्रसंग मांडला. ऐशीं हजार वानर त्यानें खाऊन टाकले. तेव्हां सुग्रीव पुढें होऊन ह्मणाला, रे राक्षसा! थांब आधीं तुझे दोनी कान व नाक उपटतों, असें ह्मणून पर्वत घेऊन धाडकन् त्याच्या उरावर आदळला. तोंच कुंभकर्णानें तसेंच त्यास बगलेंत धरलें. आणि एवढ्यांतच जय मानून स्वारी परत फिरली. बगलेंतील दुर्गंधीनें सुग्रीवाचा प्राण अगदीं कासावीस होऊन गेला. आणि मग तो संधि पाहून त्याच्या खांद्यावर चढून दोन्ही हातांनीं दोन्ही कान व तोंडानें त्याचें प्रचंड नाक उपटून उडून गेला, हें कुंभकर्णाच्या ध्यानांतही आलें नाहीं. तो आपल्या धमक्यांतच चालला होता. हें वर्तमान रावणास कळतांच तो अगदीं विरस झाला. मग त्यानें न्हाव्याकडून एका प्रचंड शेकाट्यास एक विशाल आरसा बांधवून त्यास लंकादुर्गावर उभें करून कुंभकर्णास तो आरसा दाखविला तेव्हां सुग्रीव बोलल्याप्रमाणें करून गेला, असें त्याच्या लक्षांत येऊन तो मोठ्या त्वेषानेंच परत फिरला. तेव्हां मग भगवान् रामचंद्र पुढें झाले. त्यांनीं तत्काल त्याचे दोन्ही हात व पाय उडविले, तरी ते हातपायही मारामारी करीत होते, आणि कुंभकर्ण सापासारखा पोटानेंच सरकत जाऊन वानर खात असे. ते वानरांनीं हातपाय

चेंदून त्यांचें पिष्ट केलें, व रामचंद्रानें त्याचें शिर लंकेंत उडवून पाडलें तेव्हां कितीएक घरें मोडलीं. ह्याप्रमाणें होतांच वानर जयजय करीत माघारे गेले. आणि रावण वीसही डोळ्यांतून पाणी गाळीत पडला. तेव्हां इंद्रजितानें पुष्कळ प्रकारें त्याचें समाधान केलें.

---

## अध्याय अठाविसावा.

### अतिकायादि सहा वीरांचा वध.

कुंभकर्ण निमाल्यानंतर महापार्श्व, महोदर, देवांतक, नरांतक, त्रिशिर आणि इंद्रजिताचा धाकटा बंधु अतिकाय असे सहा पुरुषार्थी वीर रावणाजवळ प्रतिज्ञा करून चतुरंग दल घेऊन युद्धास येऊन पोंचले; ते महाद्वाराबाहेर येतांच गिधाडांनीं सहाही जणांच्या रथावर वीरांचीं शिरें आणून टाकलीं. ह्या अपशकुनानें पुढील परिणाम जरी त्यांच्या लक्षांत आला तरी वीरश्रीनें त्यांनीं पुढें येऊन रणांगण माजविलेंच. वानरांनीं एकदम पुढें सरकून राक्षससैन्य झोडून पिटाळून लाविलें. हें पहातांच नरांतक पुढें सरला, त्याचा घोडा दुसरा उच्चैःश्रव्याचा बंधूच होता. असो, त्यानें एकांच अठरा लाख वानर मारले, तेव्हां वानरांची गडबडच उडाली. हें पाहून अंगद त्याचेवर धांवला आणि एका बुक्कीसरसा त्याचा त्यानें प्राण घेतला. तेव्हां देवांतक, त्रिशिर, महापार्श्व, महोदर असे चौघेही त्याचे अंगावर धांवले. इतक्यांत इकडून ऋषभ, नळ, मारुति हे अंगदास सहाय झाले आणि चौघांचीं द्वंद्वयुद्धें जुंपलीं. तेव्हां त्रिशिर व देवांतक ह्या दोघांस ढेंकणासारखेंच मारुतीनें रगडून

टाकलें, ऋषभानें महापार्श्व व नळानें महोदर ठणकावला. असा आपल्या वीरांचा फडशा पडतांच अतिकाय पुढें सरला. त्याच्या रथाला एक हजार घोडे जुंपले होते, व एकच सारथी मोठ्या चातुर्यानें एकाच दोरीनें एवढे घोडे चालवीत होता. त्याचे पुढें बिलकुल कोणच्याही वानराचा टिकाव लागेना. तेव्हां बिभीषण रामचंद्रास ह्मणाला, आपणच ह्याशीं युद्ध केलें तरच हा हटेल, एरव्हीं ह्याचेपुढें कोणाचाही टिकाव लागणार नाहीं. तें ऐकून राम पुढें सरणार तोंच लक्ष्मण त्याची आज्ञा घेऊन पुढें सरला. आणि तत्काळ दोघांचें युद्ध जुंपलें. तें फारच भयंकर युद्ध होऊन रक्ताच्या नद्या समुद्रास जाऊन मिळाल्या. शेवटीं लक्ष्मणानें ब्रह्मास्त्रमंत्रित बाण सोडून अतिकायाचें शिर उडविलें. इकडे इतर राक्षससैन्यही वानरांनीं निकालास लाविलें. लक्ष्मणाच्या अंगावर देवांनीं पुष्पवृष्टि केली व वानर जयजयकार करीतच रामचरणीं जाऊन थिरावले.

इकडे घायाळांनीं हें वर्तमान रावणाला सांगतांच रावण सिंहासनावरून धाडकन् मूर्च्छित होऊन पडला. तेव्हां इंद्रजित त्याचें समाधान करून तत्काल युद्धास आला. कांहीं वेळ समोर युद्ध करून मग मेघाआड जाऊन भडाभड शरवृष्टि करूं लागला. तेणेंकरून वानरवीर अचेतन होऊन पडूं लागले, कोठून बाण येतात हें कोणासच कळेना. इंद्रजितानें रामलक्ष्मणांसह बहुतेकांस भयंकर प्रहार करून निचेष्ट पाडलें. उरतांपैकीं बिभीषण व मारुति हे चिरंजीव असल्यामुळेंच टिकले गेले. ह्याप्रमाणें पुरुषार्थ करून जयघोष करीत स्वारी लंकेंत गेली. तेव्हां सर्व वर्तमान ऐकून रावण इंद्रजितास आलिंगून ह्मणाला, पुत्रा! माझा पराक्रम सारा तुझ्यामुळेंच आहे, ह्याप्रमाणें बोलून त्यानें जयोत्साह सुरू केला.

इकडे रामसैन्याची तर फारच दुर्दशा उडाली, बिभीषण व मारुतं ह्यांवांचून एकही कोणी सावध नव्हता, बहुतेक तर ठारच मेले होते, पण महावीर अंगद, जांबुवंत, सुषेण, सुग्रीव, राम, लक्ष्मण वगैरे हैराण होऊन पंथालाच लागले होते. बिभीषण व मारुति रात्रीचे वेळीं चुडी पेटवून चोंहींकडे हिंडले व सैन्याची दुर्दशा पाहून ते जांबुवंताकडे येऊन फारच दुःख करीत बसले. तेव्हां द्रोणाचलावरील वल्ली आणण्याविषयीं त्यानें मारुतीला सांगितलें. व रात्रीचे आंतच त्या वल्लीचा उपयोग होईल, पुढें नाहीं, असें ह्मटलें. चार कोट योजनें तेथून तो पर्वत दूर होता. परंतु जांबुवंताचें पुरतें बोलणेंही आटोपलें नाहीं तोंच रामनामाची गर्जना करीत मनोवेगासही मागें सारीत हनुमान् त्या पर्वताजवळ येऊन त्याची विनंति करून सर्व मजकूर सांगून त्याचे जवळ अमृतवल्ली मागूं लागला. परंतु पर्वतानें त्याला एकदम धडकावून टाकलें. तेव्हां भराभर शेंपटाचे विळखे मारून मारुतिराय तो पर्वत घेऊन तीन प्रहर रात्र लोटली नाहीं तोंच मारुतिराय सुवेळाचलीं जाऊन पोंचले. तोंच त्या अमृतवल्लीवरील वायु रामसैन्यास लागून रामासह सर्व वानर भराभर सावध झाले, घायही कोणाचे अंगावर उरला नाहीं. असें पाहून मारुतिराय तो पर्वत पूर्वस्थळीं ठेवून परत येऊन रामचरणीं विनटले. रामचंद्रानें मारुतीस चटकन् आलिंगून ह्मटलें हनुमंता! धन्य आहेस तूं, सर्वांचा तूं प्राणदाता आहेस, असें बोलून वेळोवेळ ते त्याचें चुंबन घेऊं लागले. तेव्हां मारुतीस तो दिवस धन्य वाटला, असो, मग सुग्रीव ह्मणाला वानरहो! पाहातां काय? जाळून टाका लंकानगर. असें ह्मणतांच प्रचंड चुडी पेटवून हनुमंतासह सर्व वानर दुर्ग ओलांडून लंकेंत जाऊन भडाभड घरें पेटवूं ला-

गले, राक्षस दृष्टीस पडला कीं चटकन् त्यास भाजून टाकीत, ह्याप्रमाणें त्यांनीं लंकेंत हलकल्लोळ माजविला. तेव्हां दूतांनीं 'हनुमंतानें द्रोणाचल आणून सैन्यास सावध करून गांवांत हा असा प्रलय चालविला' वगैरे वर्तमान रावणाचे कानावर घातलें. तेव्हां तो अत्यंत कष्टी होऊन त्यानें जंघ, प्रजंघ, क्रोधन, कुंभनिकुंभ असे कितीएक वीर पाठविले. त्यांनीं येतांच पर्जन्यास्त्र टाकून आग शांत केली. आणि मग लागलेंच उभय सैन्यांचें युद्ध जुंपलें. तेव्हांही भयंकर रणधुमाळी माजवून वानरांनीं ते सारे वीर निकालास लाविले. ह्यानंतर मकराक्ष खराक्ष, व विशालाक्ष असे तीन वीर आले. महापराक्रमीच ते वीर, रामचंद्रालाच त्यांचेपुढें व्हावें लागलें. मोठमोठे वानरही त्याच्यावर वृक्षपर्वत टाकतांना दमले, परंतु रामचंद्रानें तीन बाणांतच तिघांचा निकाल केला. ह्यानंतर इंद्रजित पुढें सरसावला. त्यानें येतांच दुष्ट होम करून अग्नीपासून एक प्रचंड कृत्या मागून घेतली, आणि मग तिच्या आड राहून त्यानें फारच घोर संग्राम केला. त्यानें वानरांतून कोणास वर हातच उचलूं देऊं नये, परंतु तो दिसत नसल्यामुळें इकडे कोणाचेंच कांहीं चालेना. शेवटीं मारुतीनें शोध करून रामास सांगितलें कीं, अंगिरास्त्रेंकरून तेवढी कृत्या फोडा, तसें रामानें करतांच इंद्रजित पुढें समोर येऊनही घोर युद्ध करूं लागला. त्यानें रीस, वानरें, रामलक्ष्मण ह्यांस विव्हळ करून पाडलें आणि मग जयघोष करीतच निघून गेला. तेव्हां रावण ह्मणाला, पुत्रा! यशस्वी खरा तूं, क्षणमात्रांत शत्रूंचा विध्वंस करतोस परंतु ते पुन्हा तयार होतात, ज्याप्रमाणें वरवर कापलेलें गवत पुन्हा फुटतें तद्वतच हा प्रकार होतो. तें मूळापासूनच हनन केलें तरच ठीक. तेव्हां इंद्रजित

प्रतिज्ञा करून ह्मणाला कीं, उद्यां तुमचे शत्रु ठार करीन तरच तोंड दाखवीन; नाहीं तर हीच तुमची आमची भेट. ह्याप्रमाणें बोलून तेथून निघाला.

## अध्याय एकुणतिसावा.

### इंद्रजितवध.

इंद्रजितानें ह्या वेळीं फारच भयंकर कृत्य केलें; त्यानें कपटेंकरून हुबेहुब सीतेसारखी स्त्री बनवून रथांत घेतली व वानरवीर त्याचेवर मारा करीत असतां सीतेस पुढें करून मारुतीस हाक मारून ह्मणाला, हीच काय रे तुझी स्वामिणी रामस्त्री, हिचेसाठीं पंचवटीपासून राक्षस मरत आले. ह्यावरून ही त्रेतायुगांतील एक कृत्याच होय, तूंही हिचेसाठीं फार कष्ट केले. तर अशीही कर्मचांडाळीण ठेवून तरी काय करायची? घे ही संभाळ, असें बोलून तिचे तुकडे तुकडे करून ते मारुतीपुढें झोंकून दिले आणि मग आपण अक्षय रथ प्राप्त व्हावा ह्यासाठीं निकुंबलवनीं जाऊन भयंकर हवन करीत बसला.

इकडे हा प्रकार पाहून सर्व वानर तर धायधाय रडत पडले. मारुतिराय तर शोकेंकरून विव्हळच होऊन पडला. त्याला वाटलें, आजवरचे सारे आपले कष्ट व्यर्थ गेले. सीताशोधापासून रामचंद्रानें आपणास सीताशोकहरण असें नांव ठेवलें. असा मींच आतां रामास हें वर्तमान सांगून आतां कोणचें बरें नांव मिळवावें? बरें, मजकूर मध्येंच गुप्त ठेवावा तेंही ठीक नाहीं अशा मोठ्या पंचाय-

तींत पडून त्यानें शेवटीं हें वर्तमान रामाचे कानीं घातलें. तें ऐकतांच दोघेही रघुवर गजबजून गेले. रामानें तर धाडकन् अंग टाकून हंबरडाच फोडला. तेव्हां सर्व वानर दुःख करीत मुकाट्यानेंच राहिले. लक्ष्मण मात्र रामास सांवरून धरून त्याचें समाधान करीत होता. पण काय प्रसंगच तो कठीण! तरी तो सारा मुहूर्तमात्रच होता. बिभीषणाचे कानीं हें वर्तमान येतांच त्यानें आपले गुप्त हेर लंकेंत पाठविले होते. त्यांनीं येऊन खरें खरें वर्तमान बिभीषणास कळविलें. तेव्हां बिभीषणानें सीतामाई खुशाल असून इंद्रजितानें हें कपट केलें, असें रामचंद्रास सांगून सर्वांचाच शोक दूर करून टाकला. मग रामलक्ष्मणांस आनंदित पाहून सर्व वानरही आनंदानें नाचूं लागले.

ह्यानंतर हळूच बिभीषण ह्मणाला, प्रभो! हा तर नुसता भ्रमच होता, परंतु संकट तर पुढें आहे. इंद्रजितानें ही एक सर्वांस भूलथाप देऊन प्रचंड हवन करण्यास ही सवड करून घेतली आहे. तो निकुंबलवनीं दुर्धर हवन करण्यास बसला आहे. त्याचा हेतु असा आहे कीं, घोडे, सारथी ह्यांसह कुंडांतून रथ प्राप्त व्हावा. हे अयोध्याधीशा! आधींच तो महावीर, तो चार वेळां युद्धास येऊन यशच घेऊन गेला. सांप्रत कुंडांतून रथ बाहेर निघण्यास आरंभ झाला आहे, तो जर सगळाच त्याचे हातीं लागला, तर मग तो कधींच कोणाला आटपला जाणार नाहीं. तेव्हां कसेंही करून यज्ञाचा विध्वंस तर केलाच पाहिजे. त्याला मारणें तर फारच कठीण आहे! बारा वर्षे जो निराहार, निद्रेवांचून ब्रह्मचर्यव्रतानें राहिला असेल, त्याचे हातून तो मारला जाणार असा त्याचा मरणनिश्चय आहे. असो, पण आतां विलंब कामाचा नाहीं. तो पहा निकुंबलवनावर

दुर्गंधयुक्त धूर किती तरी उठला आहे तो पहा'! ह्याप्रमाणें बिभीषणाचें भाषण ऐकतांच रामचंद्रानें लक्ष्मणाच्या तोंडाकडे पाहिलें. त्याचेकडून असें व्रत घडलें होतें. तेव्हां तो चटकन् प्रभूस नमस्कार करून दंड थापटून उभा राहिला. तेव्हां 'त्याची बाल्यावस्था, आणि बंधुप्रीति रामहृदयीं येऊन त्यांना गहींवर आला. मग त्यांनीं त्यास हृदयीं धरून, कोणच्या मंत्रानें कोणचें अस्त्र सोडावयाचें, तें केव्हां सोडावयाचें, कसें सोडावयाचें याविषयीं थोडक्यांत माहिती देऊन मारुति व बिभीषण ह्या दोघांच्या हातीं त्याचे हात देऊन त्यास कल्याणकारक आशीर्वाद दिले. नंतर नळ, नीळ, जांबुवंत, अंगद, गवय, गवाक्ष, ऋषभ, मैंद, पनस, केसरी इत्यादि निवडक असे दुसरे बहुत वानर बरोबर दिले. अंगदानें लक्ष्मणास स्कंधावर घेतलें. नंतर त्या सर्वांस घेऊन बिभीषण पुढें सरला. निकुंबलवन हें लंकादुर्गाबाहेर फारच रम्य असें स्थान होतें. तेथें इंद्रजित रहात असे. त्याचेही सभोंवार फारच मोठा व उंच तट होता. एवढा मोठा तो तट परंतु वानर झपकन् उडून गेले. तों आंत सभोंवार सैन्याचा पण एक तट होता. त्यालाही नकळत वानरवीर अंतरिक्षमार्गानें पुढें गेले. तों तेथें फार भयंकर भूतावळी राखण होती, तीस मारुतीनें पळवून लाविलें. आणि ज्या गुहेंत इंद्रजित होम करीत होता तेथेंच सर्वजण पोंचले. तों तेथें फारच भयंकर देखावा त्याच्या नजरेस पडला. इंद्रजित वज्रासारखें दृढ आसन घालून बसला होता. त्यानें रक्तानें स्नान केलें होतें, वस्त्रें रक्तांत भिजलेलींच होतीं, त्यानें आपले विस्तीर्ण पिंगट केंस मोकळे सोडले होते, त्यांतून टपटप रक्ताचे थेंब गळत होते. तो सात प्रेतें पसरून त्यांवर बसला होता, डोळे कपाटाप्रमाणें गच्च लावून घेतले

होते, आणि कुंडांत बिनचूक अवदानें टाकीत होता. गळ्यांत हाडकांच्या माळा होत्या व डोक्याला मेलेले साप गुंडाळले होते. ब्राह्मणांच्या शिरांचा व त्यांच्याच दांतांच्या लाह्यांचा तेथें पर्वतप्रायं ढीग पडला होता, ताजें मांस व वसा हींही अगणित तेथें होतीं. आणि त्यांच्याच आहुती एकामागें एक कुंडांत टाकीत होता. तेणेंकरून चोंहींकडे एकसारखी दुर्गंधि माजून गेली होती. आणि सूर्यापेक्षांही तेजस्वी असा रथ अर्धा बाहेर निघाला होता. असा तो बीभत्स व रौद्र प्रकार पाहून वानरांस परम क्रोध उत्पन्न होऊन त्यांनीं वृक्ष, पाषाण, पर्वत कुंडावर टाकून त्याचें आराध्य दैवत क्षुब्ध करून टाकलें. त्यासरसा रथ कुंडांत जाऊन अग्नि विझला. इतक्यांत वानरांनीं त्याचीं होमद्रव्येंही झोंकून दिलीं, यज्ञपात्रें फोडून टाकिलीं, आणि त्यास जागेवरून हालविण्यासाठीं वृक्षपाषाणांची त्यावर एकसारखी वृष्टि केली, ऋषभ वानरानें तर त्याचे अंगावर मलमूत्रही विसर्जन केलें. तेव्हां तो एकदांचा सावध होऊन चोंहींकडे पाहूं लागला. तेव्हां सर्व विपरीत प्रकार पाहून आतां दैवताचा आपणावर क्षोभ झाला, ह्यावरून आपलें आयुष्य आतां संपलें, असें त्यास वाटून त्वेषानें तो तेथून उठून सैन्य घेऊन पुढें जों सरतो तोंच लक्ष्मण धनुष्य सज्ज करून त्याच्या पुढें उभा राहिला. आणि तत्काळ उभयतांचें युद्ध जुंपलें. नंतर क्षणभर एकमेकांचें वाग्युद्धही होऊन अस्त्रप्रत्यस्त्रें झालीं. शेवटीं लक्ष्मणानें त्याचा रथ मोडला. तेव्हां दोघेही मग भूमीवरून युद्ध करूं लागले. इंद्रजिताचे बाण फारच वेगानें येत. लक्ष्मण शेषावतार ह्मणूनच ते त्याला सहन होत होते. शेवटीं रामनामांकित एक तीव्र बाण लक्ष्मणानें सोडून इंद्रजिताचा उजवा बाहु व शिर एकदम

उडविलें. बाहु तर इंद्रजिताच्या अंतःपुराच्या आंगण्यांतच पडला व शिर वरचेवरच ऋषभ वानरानें झेललें. हा इंद्राचा पूर्ण शत्रु, त्याचें शिर उडतांच इंद्र अगदीं भयापासून मुक्त झाला. त्यानें अनेक वेळ लक्ष्मणावर पुष्पवृष्टि केली. त्याला जो त्या वेळीं आनंद झाला असा रामलक्ष्मणांसही झाला नसेल. लक्ष्मणाचें शरीर ह्या प्रसंगीं अगदीं जर्जर होऊन गेलें होतें. मारुतिरायानें त्याला खांद्यावर घेऊनच ते सारे रामचंद्राकडे चालते झाले. ऋषभ त्या शिराची धूमकेतूसारखी विस्तीर्ण शेंडी हातीं धरून तें शिर हेलकावीत चालला होता. इकडे सुवेळाचळीं रामचंद्र व सुग्रीव मोठ्या काळजींत बसले होते. त्यांचा धीरही सुटून गेला होता, इतक्यांत ही सुवार्ता वानरांनीं त्यांचे कानीं घातली. ती ऐकतांच लक्ष्मणास भेटण्यासाठीं रामचंद्र पुढें सरसावले, तोंच लक्ष्मणास खालीं उतरून बिभीषण व मारुति त्याचे हात धरून त्यास रामाकडे घेऊन येत होते. मग तत्काल उभयतांच्या गांठी होऊन रामानें लक्ष्मणाला पोटाशीं धरलें व बिभीषणाचे त्यानें फारच आभार मानून ह्मटलें, हे लंकाधिपते! कितीप्रकारें तरी तूं आमचें रक्षण करतोस? केव्हां हे तुझे उपकार फिटतील ते फिटोत. असो, मग रामचंद्रानें तें इंद्रजिताचें शिर पाहून त्याची रक्तपुष्पांनीं पूजा करून तें नीट जपून ठेवण्यास सांगून लक्ष्मणाचें शरीर जें बाणघायांनीं जर्जर झालें होतें त्याची व्यवस्था करण्यास सुषेणास सांगितलें. तो ह्या कामीं मोठा चतुर होता. त्यानें तत्काळ दिव्य औषधी गोळा करून त्यांच्या योगानें एका चार घटकांत लक्ष्मणाचें शरीर पूर्ववत् केलें. अशा कांहीं विलक्षण औषधी तो जाणत असे. असो. मग रामचंद्राच्या मनास स्वस्थता येऊन त्यानें बिभीषणापासून

कसकसें युद्ध झालें वगैरे कच्चा मजकूर ऐकून घेतला. तेव्हां इंद्रजिताच्या सामर्थ्याबद्दल त्याला फारच आश्चर्य वाटलें.

## अध्याय तिसावा.

### सुलोचना सती जाते.

प्राणिमात्राचा अखेर परिणाम चांगला झाला तरच तो भाग्यवान् असें लोक ह्मणतात, नाहीं तर अभागीच तो असें ठरतें. पहा, इंद्रजिताचा केवढा पराक्रम कीं, त्याचें नांव ऐकतांच इंद्रादि देवांच्या अंगावर थरारून कांटे येत होते. त्याचा परिणाम किती तरी विचित्र झाला! धड पडलें रणरंगीं, शिर वानरांचे हातीं लागून ते त्यानें आपल्या मनाचें रंजन करीत होते, आणि एक बाहु त्याच्या अंगणांत जाऊन कोसळला. त्याची स्त्री सुलोचना ही शेषाची कन्या होती. हिचें रूप पाहून देवांगनाही आपल्या सौंदर्याचा अभिमान सोडून लाजून जात होत्या. इंद्रजितानें आपल्या पराक्रमेंकरून देव, गंधर्व इत्यादिकांच्या कन्या हरण करून सुलोचनेच्या दासी करून ठेवल्या होत्या. प्रत्यक्ष इंद्रस्त्री शची, नलस्त्री दमयंती हिच्याइतक्या रूपवान् नव्हत्या, एक कोसपर्यंत तिच्या अंगाचा सुवास दरवळत असे. अंगकांतीनें प्रत्यक्ष रत्नें उजळत होतीं. तिच्या भोंवतीं किन्नरी नेहमीं मंजुळ गायनें करीत असत, कोणी तिचा शृंगार वरचेवर सांवरतात, कोणी उपभोगाच्या नाना वस्तु हातांत घेऊन पुढें उभ्या आहेत, कोणी चवऱ्या वारितात. अशा प्रकारें सदोदित तिच्या घरीं आनंद चालू आहेच. आपला पति देवादिकांसही

अजव्य आहे ह्याचा तिला शेंकडों वेळ अनुभव असल्यामुळें ती ने-
हमीं निर्भय असे, आणि सदासर्वकाळ तिच्या येथें आनंद चालून
होता. परंतु संपला तो आपला सद्दीचा जोर हें तिच्या लक्षांत को-
ठून येणार ? ती नित्याप्रमाणें आनंदांत असतां एकाएकीं तिच्या
दासी घाबरेपणानें येऊन ह्मणाल्या, सरकार आपल्या मणिमय अं-
गणांत आकाशमार्गानें कोण्या वीराचा तुटका बाहु येऊन कोसळला.
तें ऐकतांच तिला उचका भरला, ती चटकन् रत्नजडित पादुका
घालून तेथून निघाली, विद्युल्लतेप्रमाणें तिचें वस्त्र चमकत होतें.
तिची दृष्टि त्या बाहूवर येतांच चटकन् तिनें ओळखला. निरंतर तो
तिच्या कंठांत असणारा, तिला तो ओळखण्यास उशीर कशाचा.
तिचा खरकन् मुखचंद्र उतरला, डोळे विव्हळ झाले, अंग जड पडलें,
पाऊलही तिला पुढें टाकवेना. तिनें तोंडांतला विडा एकीकडे फेंक-
ला, व ह्मणाली, सख्यांनो, बुडालें आज माझें जहाज ! ह्याप्रमाणें
बोलून तिनें तोंड सोडून हलकल्लोळ मांडला ! धडाधड ती अंग टाकी, व
सख्या तिला सांवरून धरीत. तिनें शेंकडों वेळ तो भुज हृदयाशीं
धरला. व त्या दंडासच ह्मणाली, पतीस कोणच्या प्रकारें मरण
प्राप्त झालें तें मला लिहून कळवावें. माझी जर पतीचे चरणीं खरी
निष्ठा असेल तर एवढें करावेंच. असें बोलून दऊत लेखणी व भूर्जपत्र
त्या दंडापुढें ठेवलें. सुलोचना खरोखरीच महासाध्वी, तिच्या त्या
पुण्यानें निर्जीव हस्तानेंही तिला पत्र लिहून समाचार कळविला.
पत्रांत मजकूर असा होता कीं, "हे शेषकन्ये सुकुमारि, चंपककलिके,
ममप्राणवल्लभे सुलोचने ! मी जयाची आशा धरून गुप्त ठिकाणीं
हवन करीत होतों, अग्निकुंडांतून अर्धा रथ बाहेरही आला होता.
अशी फलप्राप्तीची वेळ साधून शत्रूंनीं येऊन प्रचंड शिळा टाकून

आराध्यदैवत क्षुब्ध केलें, सर्व पर्वत कष्टेंकरून चढून शिखरावरून ढांसळल्याप्रमाणेंच ही गोष्ट घडली. शत्रूंनीं अखेर वेळ सांभाळली. आमचें प्रारब्ध. इतकेंच असो, पुढें जाऊन मी दारुण संग्राम केला, परंतु जय पारखा झाला. लक्ष्मण हा मोठा निधडा वीर, धनुर्विद्येंत निष्णात, शिवाय केवळ बारा वर्षें त्यानें आहारनिद्रामैथुनावांचून राहून माझ्या शिराच्या अपेक्षेनें ही त्यानें दिव्य तपश्चर्याच केली होती. ह्यामुळें मी बिभीषणाप्रमाणें देहआशा न धरून लक्ष्मणास शिर देऊन रामचंद्र हा आपला मित्र जोडला. धड समरांगणीं उभेंच आहे, आणि हे प्राणाहूनही प्रिये सुलोचने! हा बाहु मी तुला मूळ पाठविला आहे, आणखी खरें सुख श्रीरामचरणींच आहे तर आतां सत्वर येऊन तूं मला भेट, मी तुझी वाट पहात बसलों आहें; तर आतां व्यर्थ खोळंबा करूं नको, हा आशीर्वाद." असें पत्र वाचतांच ती धाडकन् पडली; आणि तिनें भयंकर शोक मांडला. त्या शोकानें तिचे पाळींव पशुपक्षीही शोकाक्रांत होऊन गेले. नानाप्रकारें तिच्या सख्या तिची समजूत करीत होत्या. मग तिनें शोकवेग आवरून धरून शुकसारिका मयूर आदिकरून पक्षी मुक्त केले. आपल्या अगाध संपत्तीनें भरलेल्या मंदिरास नमन केलें, पालखींत ती पतीची भुजा ठेवली व आपण घोडीवर बसून लंकेस गेली. ती अस्तमानाची वेळा होती, व लढाई चालू असल्यामुळें महाद्वारें बंद करून जिकडे तिकडे पहारेवाले राक्षस खडापहारा करीत होते. इंद्रजिताची वार्ता गांवांत तोंपर्यंत कोणास कळलीच नव्हती. सुलोचना महाद्वारीं येतांच द्वारपालांनीं दिंड्या उघडून तिला रस्ता दिला. तिच्या ह्या अवेळीं येण्यानें लोक अगदीं गडबडून गेले. ती मग तशीच सभेंत गेली. नित्याप्रमाणें रावण सिंहासनावर बसला होता. तोही हिला पाहतांच

गडबडून गेला. तिनें तत्काल त्याला नमस्कार करून, तें पत्र पुढें ठेवलें. तो ह्मणाला, बाळे ! तूं कधींच बाहेर न पडणारी ती ह्या भलत्या वेळीं आणि माझ्या ह्या सभेंत कां बरें आलीस ? तेव्हां ती ह्मणाली, "सती जाण्यास मी आज्ञा मागतें, भ्रतार स्वर्गी गेले." हाय हाय ! हे तिचे शब्द रावणास हृदयावर शतशः वज्रपातच झाल्याप्रमाणें वाटले. तो ऊर बडवीत धाडकन् खालीं कोसळला. व तोंडांत माती घालून दहा तोंडांनीं शंखध्वनीच करूं लागला. लागलीच मंदोदरी व दुसऱ्या ऐंशींहजार त्याच्या स्त्रियाही तेथें आल्या आणि एकच आकांत ओढवला. शंखध्वनीला तर तेथें मितीच नाहींशी झाली. मंदोदरीनें जो कांहीं शोक केला तेणेंकरून तर तिचा प्राणही निघून जाण्याची वेळ आली, परंतु तिला पतिमरणाचें दुःख भोगावयाचें होतें ह्मणूनच ती वांचली. असो, आधीं तो पुत्रशोक, तो वज्रपातापेक्षांही कठीण; त्यांतून इंद्रजितासारख्या त्रिभुवनैकवीराबद्दलचा. तेव्हां त्या शोकाला काय विचारावें ! डोळ्यांतील अश्रुपातांनीं तेथें नद्या वाहल्या !!! ह्याप्रमाणें शोकातिशयांत रावण गढून गेला असतां सुलोचना ह्मणाली, पति माझी वाट पाहून शिणले असतील, तर मला तेवढें शिर आणून द्यावें ह्मणजे मी सहगमन करतें. तें ऐकतांच रावण क्रोधानें व्याप्त होऊन ह्मणाला, ठीक आहे, हा पहा आतांच जाऊन त्या मानवांच्या कार्ट्यांचीं शिरें खुडून आणतों. असें बोलून सैन्यास सूचना देण्यासाठीं त्यानें निशाणावर घाव घालवण्यास सांगितलें. व आपणही आपली युद्धगमनाची तयारी करूं लागला. परंतु ही वेळा अशा धाडसाची नाहीं असें जाणून मंदोदरीनें सुलोचनेच्या कानीं सांगितलें कीं, तूंच तेथें जाऊन शिर मागण्याची आज्ञा माग, रामचंद्र हा चराचराचें जीवन आहे. जानकीवांचून त्यास इतर स्त्रिया

मातेसमान आहेत, शिवाय हनुमंत, बिभीषण हेही पुण्यपरायण आहेत. ते तुझे पाठिराखेच समज. तुला तेथें भय धरण्याचें कांहीं कारण नाहीं. अनायासें शिराचे निमित्तानें तुला भगवंताचें दर्शनही घडेल. तेव्हां मी सांगतें असेंच तूं कर. हें सुलोचनेसही चांगलें वाटलें, व तिनें रावणाजवळ त्याचप्रमाणें विनंति केली. रावण ह्मणाला, त्यानें जर तुला तेथें ठेवून घेतलें तर कसें करावें ? सुलोचना ह्मणाली, रामचंद्र अशांतला नाहींच. परस्त्रीचा अभिलाष करून कोणासच जय प्राप्त झाला नाहीं, हें रामचंद्र चांगलें जाणतो. तेव्हां मला तेथें दगा प्राप्त होणार नाहीं. तिचे हे शब्द रावणाच्या अगदीं मर्मींच लागले. त्यानें खालीं तोंड घालून ह्मटलें, बरें तर जा, तुला दगा केल्याची गोष्ट माझ्या कानीं तर येऊंदे ह्मणजे क्षणांत त्यांची रक्षा करून टाकतों. असो, मग संसारमायेचा त्याग करून ती रामचंद्राचें ध्यान करीतच त्याचे दर्शनास चालली. तिचें सौंदर्य पाहतांच इंद्रजितवधानें भयभीत होऊन रावणानेंही सीतादेवीच पाठविली, असें वानरांस वाटून ते ह्याप्रमाणेंच रामचंद्राशीं बोलूं लागले. तेव्हां ते ह्मणाले, रावणाच्या प्राणांतावांचून सीता दृष्टीस पडणें नाहीं. असो, रामचंद्र मध्यें उंचशा जागेवर बसले आहेत, भोंवतीं यंत्राकार वानरमंडळी उभी आहे. अशा स्थळीं ती शेषकुमारी पायीं चालत येऊन रामचंद्राची परम देदीप्यमान घवघवीत मूर्ति पाहून समाधान पावली. अहाहा ! काय कर्माची गति गहन. देवादिकांला जिचें नखही दृष्टीस पडणें दुर्लभ, ती पतिशिरासाठीं रडत ओरडत मार्गानें चालावी काय ? तिनें येतांच रामचरणीं लोटांगण घालून प्रथमतः 'रामाचें स्तवन केलें व मग आपला येण्याचा हेतु रामचरणीं सादर केला. तेव्हां राम ह्मणाले, आह्मी येथें शिर आ-

णलें हें तुला कसें कळलें ? तेव्हां तिनें तो मजकूर सांगून भूर्जपत्र पुढें ठेवलें. तेव्हां वानर ह्मणाले, हें तर फार अघटित, पण आतां जर ही तें शिर हांसवील तरच हें हिचें ह्मणणें खरें मानूं. राम ह्मणाले, ही महापतिव्रता आहे, ही काय न करील ? असें ह्मणून त्यांनीं ऋषभ वानरास तें शिर आणून द्यावयास सांगितलें. महाभयंकर तें शिर, धूमकेतूप्रमाणें विस्तीर्ण शेंडी, सव्यनेत्र झांकलेला, जीभ बाहेर लोळत आहे, कपाळावर शेंदूर माखला आहे. असें तें पतिशिर पाहतांच तिनें तें आपल्या शालीवर ठेवलें, व त्यास नानाप्रकारें आळवून हंसण्याची विनंति करूं लागली. शेवटीं असेंही ह्मणाली, प्राणनाथ ! आधीं जर मला आपण थोडी सूचना देतां तर मी आपल्या बापास आपल्या सहायास बोलाविलें असतें; असें ती ह्मणतांच गदगदां तें शिर हंसलें. तेव्हां ह्याच बोलण्यानें तें कां हंसलें असें वानरांनीं विचारल्यावरून रामचंद्र ह्मणाले, शेष तोच लक्ष्मण व तोच सुलोचनेचा बाप, त्यानेंच जांवयास मारलें. तर तो सहाय कोठून करणार, ह्मणून शिर हंसलें. रामचंद्रानें हें महज सांगितलें, पण येणेंकरून लक्ष्मण अगदींच मोह पावला. व मी आतां माझ्या जांवयास उठवीन असें तो बोलूं लागला. तेव्हां इंद्रादिक देव, वानर यांची एकच धांदल उडाली. सुलोचनेसही आशा उत्पन्न झाली. परंतु रामचंद्रानें लक्ष्मणाचा मोह दूर केला. तेव्हां निराश होऊन सुलोचना ह्मणाली, सती जातांनां मला वानरांनीं त्रास देऊं नये एवढा बंदोबस्त ठेवावा. असें बोलून ती शिर घेऊन परतली. नंतर धड, शिर, हस्त सर्व घेऊन सैमुद्रतीरीं जाऊन तिनें प्रचंड कुंड करून त्यांत तें सर्व ठेवून अग्नि लाविला. नंतर मंगलवाद्यें देऊन धर्मशिळेवर उभी राहिली. तोंच तिचा

पति दिव्य देह पावून विमानांत बसून तिची वाट पहात असलेला तिनें पाहतांच ती देह अग्नींत टाकून दिव्य रूप पावून पतीसह विमानांत बसून वैकुंठीं गेली. रावण, मंदोदरी वगैरे सर्व तेथें आले होते, ते स्नान करून चालते झाले. तेव्हां श्रीरामाचें व सुलोचनेचें वर्णन करीतच सर्वांनीं ती रात्र लोटली.

---

## अध्याय एकतिसावा.

### अहिरावण व महिरावणवध.

पुत्र व बंधु यांच्या वियोगानें रावण भयग्रस्त होऊन शोक करीत पडला असतां विद्युज्जिव्ह प्रधान ह्मणाला, शोक तर हा झालाच, परंतु शत्रूंचा उच्छेद झालाच पाहिजे. तर पाताळीं अहिमहि दोघे बंधु महिकावतीस रहातात, त्यांना हें वर्तमान कळवावें. ते महान् युक्तिमान आहेत, ते रामलक्ष्मणांस उद्यांच उचलून नेऊन आपल्या भद्रकाली देवीस बळी देतील. मग वरकड सैन्याची आपण सहज वाट लावूं. ही गोष्ट रावणास मानून त्यानें पत्र पाठवून त्या दोघांस आणवून रडत रडत सर्व मजकूर त्यांना कळविला. तेव्हां त्यांनीं ती गोष्ट कबूल केली. ही बातमी बिभीषणाच्या गुप्त हेरांनीं त्यास कळविली. तेव्हां बिभीषणानें वानरांस सांगून त्यांच्या शेंपटांचा प्रचंड दुर्ग रचविला. त्यामध्यें मृगचर्मावर रामलक्ष्मण हे स्वस्थ निजले. दुर्गावर ठिकठिकाणीं वानर सावधपणें रामलीला गात होते. ह्याप्रमाणें इकडे कडेकोट बंदोबस्त झाला.

मग रात्र होऊन जिकडे तिकडे अंधार पडला, जणुं काळपुरुषानें ती

कांबळीच अंगावर घेतली आहे. भालू, गिधाडें, घुबडें, पिंगळे हे भयं-
कर शब्द करूं लागले. भूतें, यक्षिणी दिवट्या घेऊन हिंडूं लागल्या.
अशा रात्रीच्या घोरसमयीं ते दोघे दरवडेखोर हुडकीत हुडकीत
गडापर्यंत आले. व उड्या मारतात तों पुच्छदुर्गावर आदळून द-
बादब कोसळले. मग त्यांनीं दुर्ग फोडण्याविषयीं त्यावर शस्त्रेंही
मारलीं, पण तींच मोडलीं. मग कांहीं उपाय नाहीं असें जाणून
आकाशमंडळापर्यंत उड्या मारून ते नेमकेच रामलक्ष्मणांजवळ
उतरले. तेव्हां दोघांस गाढ झोंप लागलेली पाहून त्यांचेवर मोह-
नास्त्र टाकलें. आणि मग अंथरुणासह त्यांचीं मोटकुळीं डोक्यावर
घेऊन तेथच्या तेथंच सात हजार कोसांचें विवर कोरून ते पा-
ताळीं गेले. पुढें त्या विवरद्वारीं वीस कोटी राक्षसांसह मकरध्वजास
रक्षणास ठेवून तेरा हजार योजनांचा मध्यंतरीं दधिसमुद्र लागला;
तो ओलांडून महिकावतीस जाऊन रामलक्ष्मणांस गुप्तस्थळीं ठेवून
देवीच्या पूजनाची सिद्धता करूं लागले.

इकडे कोठें उजाडलें नाहीं तोंच नित्यनियमाप्रमाणें वानर राम-
दर्शनास येऊन रामलक्ष्मण नसल्यामुळें एकदम शोकाक्रांत होऊन
गेले. तेव्हां बिभीषणानें ही वार्ता अगदीं गुप्त ठेवावयास सांगून
मारुति, नळ, नीळ, अंगद व जांबुवंत ह्यांस त्यानें रामशोधास पाठ-
विलें. ते महाप्रतापी वीर त्या विवरमार्गानेंच पाताळीं गेले. तेथें ह्यांस
पाहतांच राक्षसांची व ह्यांची लढाई जुंपली. तेव्हां, ह्यांनीं एका
क्षणांत वीस कोटीही राक्षसें मारले. त्यामुळें मकरध्वज व मारुति-
राय ह्यांचें प्रचंड मल्लयुद्ध होऊन मारुतिराय त्यास पाडून त्याचे
उरावर बसले. तेव्हां तो ह्मणाला जर माझा पिता मारुतिराय येथें
येता तर तुला दाखविलें असतें. तें ह्या बालब्रह्मचाऱ्यानें ऐकतां

स्वारी चपापून एकीकडे होऊन मारुति तुझा पिता कसा ह्मणून विचारूं लागली. तो ह्मणाला, लंका दहन करून शेंपूट विझविण्यासाठीं मारुति समुद्रावर आला असतां त्यानें आपल्या अंगचा फेंस काढून तेथें टाकला, तो एका मगरीनें खाल्ला, तोंच तिला गर्भ राहून मी तिचे पोटीं जन्मलों. मारुति ह्मणाला, तर मग तोच मी. तें ऐकून मकरध्वजानें मगरीस बोलाविलें. ती ह्मणाली, पण हें रूप फारच अल्प आहे. तेव्हां मारुतीनें लंकादहनकाळचें रूप घेऊन तिचा संशय दूर केला. मग काय वरचीच गोष्ट, त्यानें रामलक्ष्मणांविषयीं तिला मजकूर विचारला. तो तिनें सांगून ह्मटलें कीं, जर तुह्मी सारे माझ्या मुखांत बसाल तर मी एक घटकेंत महिकावतीस तुह्मांला पोंचवीन. परंतु मारुतिराय बायकांच्या बळानें का वागणारा ? त्यानें बाकीच्यांस तेथें ठेवून रामस्मरण करून ताडकन् उडी मारली. आणि महिकावतीस येऊन सूक्ष्मरूपानें देवीच्या मंदिरांत शिरून आधीं देवळाचीं दारें बळकट लावून घेतलीं. नंतर देवीस मोरीच्या तोंडाशीं ठेवून तीवर एक पाय ठेवला व आपण अंगास शेंदूर फांकून देवीचे जागीं बसून राहिला. इतकें होत आहे तोंच हे दोघे बेरड पूजासाहित्य घेऊन दारें ठोठावूं लागले. तेव्हां ही महारुद्रादेवी आंतूनच ह्मणाली, हे महाभक्तांनो ! आज मी तुह्मांवर प्रसन्न आहें. तुह्मी उत्तम दोघे राजपुत्र मला बळी आणलेत. येणेंकरून मी तुह्मांस अक्षयपद देईन. तर आतां आजचे दिवशीं दारें न उघडतां वरून भोंक पाडूनच पूजा समर्पण करावी. तें ऐकून कांहीं शहाणे तर डचकून चालतेच झाले. असो, मग त्या दोघांनीं वरून गवाक्ष पाडून पंचामृताच्या कावडीच्या कावडी आंत लोटल्या. नंतर अन्नाचे ढीगही आंत रिचविले

तें सारें देवीनें स्वाहा केलें. तीर्थासाठीं लोक मोरींत काठ्या घालूं लागले, त्या मात्र देवीस टोंचूं लागल्या. इतकें झाल्यावर देवी ह्मणाली; आतां तेवढे बळी आणा ह्मणजे झालें. तें ऐकून मोठ्या बंदोबस्तानें राम लक्ष्मणांस तेथें घेऊन आले. त्या वेळीं त्यांचेवरील मोहनास्त्र काढलें होतें. तेव्हां भोंवतालीं राक्षसभार पाहून ते अगदीं घाबरून गेले. जवळ धनुष्यें नाहींत. त्यामुळें त्यांच्या डोळ्यांतून एकसारख्या अश्रुधारा चालल्या होत्या. देवीनें त्या दोघांस मात्र दार उघडून आंत घेतलें. तेव्हां तें भयंकर रूप पाहून दोघे फारच घाबरून गेले. मग देवी ह्मणाली, आतां तुह्मांस कोणाचें स्मरण करावयाचें असेल तर करा. तें ऐकून रामचंद्र मारुतीचा धांवा करूं लागले. भक्तानें संकटीं देवाचा धांवा पुष्कळां वेळ केला आहे, पण भक्ताचा धांवा देवांनीं एवढाच केला. असो, मग मारुतिरायानें तत्काल आपलें रूप प्रगट केलें. तेव्हां रामलक्ष्मणांचा आनंद काय सांगावा! ते ह्मणाले, मारुतिराया, जन्मोजन्मीं रे तुझे उपकार विसरणार नाहीं. असो, पण आमचीं धनुष्यें जर ह्या वेळीं आणून देशील तर आतांच ह्या दुष्टांचा चेंदा उडवितों. तें ऐकून मनापेक्षांही जास्त वेगानें लंकेहून मारुतीनें त्यांचीं धनुष्यें आणून दिलीं. नंतर त्या दोघांस पाठीशीं लपवून मारुति ह्मणाले, आतां बळी घेऊन मी तृप्त झालें, एकेकानें दर्शनास यावें. त्याप्रमाणें प्रथमतः अहि आंत आला. तों हें रूप पाहून खूपच घाबरला, तरी त्यानें नमस्कारासाठीं डोकें खालीं ठवलें; तों मारुतीनें पायानें त्याचें डोकें रगडून त्याचा प्राण घेतला. त्यानें त्या वेळीं जे हातपाय झाडले तेणेंकरून सारें देऊळ दणाणून गेलें. पुढें बराच वेळ झाला तरी अहि बाहेर येईना, ह्मणून पुजारी आंत येऊं लागला; तो द्रव्याच्या आशेनें आधींच पुढें सरला. त्याला

तर देवीनें ढेंकणाप्रमाणें पायानें रगडलें. तें पाहतांच दुसरा शंख करीतच बाहेर येऊन दोघांची वाट लागलेली सांगून ह्मणाला, लंका जाळणाराच वानर आंत आहे. तें ऐकतां बहुतेक राक्षस तर तेथून पळालेच. इतक्यांत मारुतिराय दोघांसह बाहेर पडून त्यानें आधीं तें देऊळ शेंपटानें समुद्रांत भिरकावून दिलें आणि मग राक्षसांचा समाचार घेत सुटला. शरण आले तेवढेच मात्र त्याचेपासून वांचले, बाकीचे निकालास लागले. नंतर महि व राम ह्यांचें प्रचंड युद्ध जुंपलें. परंतु रामबाणानें महीच्या अंगांतून रक्तबिंदु पडत त्यापासून महीप्रमाणेंच दुसरे राक्षस निर्माण होऊन लढाई करूं लागले. असा हा चमत्कार पाहून ह्याचें बीज शोधण्यासाठीं मारुतिराय मगरीकडे गेले. तेव्हां ती ह्मणाली, एक अप्सरा मार्गानें जात असतां भृगुऋषीची व तिची गांठ पडली. तेव्हां ती त्याला थेरडा कुद्रा असें ह्मणाली. तेणेंकरून तूं सर्पिणी होशील असा ऋषीनें तिला शाप दिला. मग तिनें त्याची पायधरणी करून उःशाप मागितला असतां तो ह्मणाला, एक पद्मिणीप्रमाणें तुझें रूप होऊन तुजवर सूर्याचें रेत पडेल, तेव्हां तुझा उद्धार होईल. त्याप्रमाणेंच झालें. सूर्यरेत थोडें तिच्या तोंडांत पडलें त्यापासून अहि व थोडें महीवर पडलें त्यापासून महि झाला, आणि ती रंभा उद्धरून गेली. ह्यापुढील वर्तमान महीची स्त्री चंद्रसेना ही पतिव्रता आहे तिला विचारून पाहावें. हें ऐकतांच मारुतिराय चंद्रसेनेच्या महालीं आला. त्या वेळीं रामचंद्रास पाहून एकवेळ तरी त्यास भोगावें असें वाटून चंद्रसेना अगदीं वेडी होऊन बसली होती. मारुतीनें तिला टाळी वाजवून सावध करून येण्याचें कारण सांगितलें. तिनें आपल्या मनांतील हेतु एकवेळ तरी पूर्ण करण्याची मारुतीजवळ भाक घेऊन सांगितलें कीं, महीनें शंकरास

प्रसन्न करून असा वर मागून घेतला कीं, त्याच्या रक्तबिंदूंत अमृत-बिंदु पडतांच तसेच वीर निर्माण व्हावेत. त्याच्या रक्तबिंदूंत शंकराच्या कंठांतील भ्रमरमाळेंतील भ्रमर पाताळकुंडांतील अमृत आणून टाकीत असतात. हें ऐकून मारुति पाताळीं जाऊन पाहतो तों अमृत नेणाऱ्या भ्रमरांची एकसारखी रांग लागली आहे. मग त्यानें तत्काळ ते सारे भ्रमर मारिले. त्यांपैकीं एक त्यांचा राजा होता, त्यास मारणार तों तो मी तुझ्या एखादे वेळीं तरी उपयोगी पडेन असें बोलून क्षमा मागूं लागला. ती देऊन स्वारी परत आली. मग रामाकडून ब्रह्मास्त्र सोडवून सारे महिरावण नष्ट करविले. तेव्हां एकटाच मूळचा महि मात्र राहिला, तोही रामानें ठार केला. ह्याप्रमाणें होतांच उरलेले राक्षस रामास शरण आले; तेव्हां युद्ध बंद झालें. नंतर मारुतीनें केलेला प्रकार रामचंद्रास कळविला. तेव्हां चंद्रसेनेस भोग देण्याचें संकट कसें तरी टाळण्यास रामानें त्यास सांगितलें. मग मारुतीनें चंद्रसेनेस सांगितलें कीं, तूं उत्तम शय्या कर, मी रामास घेऊन येतों. पलंग चांगला बळकट घाल, मोडला तर राम बसणार नाहींत. नंतर तो पलंग आंतून कोरून काढण्याविषयीं त्या भ्रमरराजास सांगून काम पुरें होतांच रामास तेथें नेलें. नंतर थोडा विलास होऊन ते पलंगावर येतांच तो मोडला. तेव्हां रामचंद्र उठून चालते झाले. हें मारुतीचें कपट जाणून चंद्रसेना त्यास शाप देऊं लागली. ह्मणून पुढल्या जन्मीं तूं सत्यभामा नांवाची माझी स्त्री होऊन मी तुझी इच्छा पूर्ण करीन असें बोलून राम तेथून निघाले. नंतर मकरध्वजास तेथचें राज्य देऊन मारुतिराय त्या दोघांस घेऊन विवरद्वारीं आले. व तेथून बाकीच्या वानरांसह सुवेळाचळीं येऊन पोंचले; तेव्हां सर्वांस परम आनंद झाला.

तेथें रामचंद्रानें मारुतीचा पराक्रम स्वतः वर्णून ह्मटलें कीं, ह्या ब्रह्मांडमंडपांत मारुतीसारखा भक्त दुसरा नाहीं ! ! !

## अध्याय बत्तिसावा.

### लक्ष्मणशक्तिप्रहार.

रणरंगधीर रामचंद्र अहिमहींस ठार करून तयार होऊन बसला आहे हें ऐकून रावणास दुःख तर झालेंच. पण तें दूर ठेवून तो भयंकर सैन्य घेऊन युद्धास आला; तेव्हां तत्काळ पुन्हा रणधुमाळी माजली. ह्या वेळीं दोघां वीरांचा सामना झाला. प्रथमतः वाग्युद्ध मग अनिवार शस्त्रयुद्ध चालू झालें, दोघेही महावीर व एकमेकांचे कट्टे शत्रु. कांहीं वेळ त्यांचें युद्ध चालून रावणानें भयंकर पांच बाण रामावर टाकले. ते त्याच्या शरीरांतून पार निघून गेले. तरी रामानें वज्रठाण हालविलें नाहीं. नंतर सात बाण सोडले ते रावणाच्या शरीरांतून लंकेंत जाऊन पडले, तेव्हां त्यास चांगलीच गिरगिरी आली. इतक्यांत रामास मागें सारून लक्ष्मण पुढें सरला. आणि त्यानें रावणाचीं दहाही धनुष्यें तोडलीं. बिभीषणानेंही त्याचे आठ घोडे मारले. तेव्हां रावण दुसऱ्या रथावर बसून त्यानें बिभीषणावर प्राणहारक अशी एक शक्ति टाकली. लक्ष्मणानें अर्धमार्गांतच तिचे तीन तुकडे केले. तेणेंकरून रावणास फारच राग येऊन लक्ष्मणावर टाकण्यासाठीं त्यानें मयदत्त शक्ति बाहेर काढली. ती तर प्रळयकाळची विद्युल्लताच. सात कोट मंत्रांचें तेज तिचे ठायीं होतें. ती हातीं घेऊन बिभीषणास ह्मणाला, रे पंढा, तुला हाल-

क्ष्मण वांचवितो काय, ह्यानेंच माझे इंद्रजित, अतिकाय मारले. पाहतों आतां कसा वांचतो तें. असें बोलून न्यासबीज जपून ती त्यानें लक्ष्मणाचे अंगावर टाकली. ती सहस्त्र विजांच्या कडकडाटाप्रमाणेंच गर्जना करीत निघाली. त्या वेळीं अष्टदिग्गज खालीं कोसळले. नक्षत्रपात तर बहुत झाले. देवांनीं आपलीं विमानें दूर पळविलीं. थबाथब आपटून गतप्राण झाले. अशी ती अनिवार शक्ति यत आहे असें पाहून त्या महावीर मारुतिरायांनं पटकन् उडी मारून तिला धरलें. व आतां पायांखालीं घालून तिला मोडणार तोंच ती स्त्रीरूप बनून ह्मणाली. रे तूं ब्रह्मचारी आणि मला स्त्रीला धरतोस ? तें ऐकतांच मारुतीनें तिला सोडून दिलें. त्यावेळेबर पुन्हा ती शक्तिरूप धरून लक्ष्मणाचें ऊर फोडून पाताळगंगेंत जाऊन थंड झाली. असो, लक्ष्मण तर तेणेंकरून अचेतन होऊन पडला. धनुष्यावर तीर ठेवून तें कानाडीपर्यंत ओढलेलें तसेंच होतें. त्याच्या शरीरांतून रक्ताचा प्रवाह चालून श्वासोच्छ्वास मात्र चालू होता. ह्याप्रमाणें होतांच रामसैन्याचें दुःख काय सांगावें, श्रीरामही धाय मोकलून रडूं लागले. तेव्हां बिभीषण ह्मणाले, प्रभो ! शोक तर झालाच आहे, परंतु शत्रु रणांगणीं उभा आहे, तेव्हां ही शोक करण्याची वेळ नाहीं. तें ऐकून प्रळयरुद्रवत् कोप धारण करून रामानें इतकें कांहीं भयंकर युद्ध केलें कीं, त्याला दुसरी उपमाच नाहीं. त्या वेळीं रामचंद्रानें जे राक्षस मारले त्यांची गणती शेष, चित्रगुप्त ह्यांनाही लागली नाहीं. रावणास त्यांनीं इतकें घाबरें केलें कीं, त्याला जिकडे तिकडे रामच राम दिसूं लागले. तेव्हां तो अगदींच घाबरून अंतःपुरांतच पळून गेला. तरी तेथेंही राम आपल्या मागें लागलाच आहे असें त्यास दिसे. शेवटीं तो मंदोदरीच्या गळ्यास

मिठी मारून स्वस्थ डोळे झांकून पडला. नंतर कांहीं वेळानें सावध होऊन ह्मणाला, शुक्रदत्तमंत्रेंकरून मी आतां हवन करतों. मंदोदरी ह्मणाली, अझून तरी रामाची मैत्री करा, नाहीं तर युद्धच करा. परंतु तो न ऐकतां भूमींत गुप्त गुहा कोरून तेथें हवनाचीच तयारी करूं लागला. आणि मारुति कदाचित् द्रोणाचल आणील तो त्याच्या हातीं न लागावा ह्मणून कालनेमी राक्षसास सांगितलें. कालनेमी हा मोठा मायावी होता. तो वाटेंत आश्रम बांधून आपण ऋषि होऊन अन्नसत्र, पाणपोई घालून बसला.

इकडे रामचंद्र तर शोकानें बेहोष झाले. तेव्हां बिभीपणानें स्थिरस्थावर करून मारुतिरायास द्रोणाचलाकडे पाठविलें. तो जात जात कालनेमीच्या आश्रमावरच उतरला. त्याला तहान फार लागली होती. कालनेमीनें त्याची पुष्कळ विनंति केली, परंतु तो तेथें पाणी न पितां नदीवर गेला. तेथें तो पाणी पीत असतां एका विवशीनें त्याचा पाय धरला. मारुतीनें तत्काळच तिला मुक्ति दिली तिनें उद्धरून जातांना कालनेमीचें कपट मारुतीस कळविलें होतें त्यामुळें त्यानें आश्रमीं येऊन कालनेमी कांहीं दक्षणा मागत असतां एका बुक्कीसरसाच त्याचा प्राण घेतला. पुढें त्याचा कड घेऊन गंधर्वही आले होते; मारुतीनें त्यांनाही वाटेस लाविलें. नंतर द्रोणाचलीं जाऊन पूर्ववतच त्यास उचलून घेऊन स्वारी चालली. लंकेकडे जाण्याचा रस्ता अयोध्येवरूनच होता, तेथून मारुतीची धांव चालली असतां भरतानें बाण मारून त्यास खालीं पाडलें. त्याचें कारण असें कीं, लक्ष्मण अचेतन पडला त्या रात्रीं भरतास कांहीं अनिष्ट स्वप्न पडून तो रातोरातच वसिष्ठानुमतें त्याची शांति करीत होता. .त्याचे अंगावर पर्वतावरील वल्लींचा प्रकाश येतांच हा कोणी

रावणाचा साह्यकारी पर्वत घेऊन धांवत आहे अशा कल्पनेनें भरताकडून असें झालें. परंतु मारुति रामस्मरण करीत खालीं पडतांच भरतास वाईट वाटून तो त्याचे जवळ गेला. आणि उभयतांनींही आपली हकीगत उभयतांस कळवून फारच कष्टी झाले. नंतर मारुतिराय तेथून पर्वत घेऊन उडाले. त्याच्या प्रकाशानें सूर्य उगवला असें रामचंद्रास वाटून तेही भरताप्रमाणेंच बाण मारणार तोंच सुषेणानें मजकूर सांगून त्यास स्थिर केलें. इतक्यांत मारुतिही तेथें आले. नंतर सुषेणानें औषधीरस लक्ष्मणाचे मुखीं घालून त्याला व पडलेल्या वानरांसही सावध केलें. लक्ष्मण उठतांच कोठें तो दुरात्मा रावण असें ह्मणाला. तेणेंकरून रामास परमानंद वाटून त्यानें आधीं मारुतीसच आलिंगिलें. असो, मग पर्वत जेथचे तेथें ठेवून मारुतिरायानें परत येऊन भरताविषयींचा मजकूर सांगितला. कालनेमीचें वर्तमान ऐकून रावणानें आणखी शंभर राक्षस मारुतीवर पाठविले होते तेही परत जातांना त्यानें ठार केले.

## अध्याय तेतिसावा.

### रावणवध.

इकडे रामसैन्याकडे असा आनंद चालू होऊन ते रावणाची वाट पहात बसले. परंतु रावण इंद्रजिताप्रमाणेंच अजेय्य रथ मिळविण्यासाठीं होम करीत होता. हें वर्तमान बिभीषणाचे दूतांकडून कळलें. तेव्हां हनुमंतादि दहा प्रमुख वानर दहा हजार वानरसैन्य घेऊन लंकेंत गेले. तेथें सरमेनें त्यांस रावणाची जागा दाखविली.

तो दुर्गाखालीं एक विस्तीर्ण विवर कोरून बसला होता, तेथें वान रांनीं शिरून सारा विध्वंस केला. व रावणास जागेवरून हालवि ण्यांविषयीं होते तेवढे उपाय केले पण तो जागचा हालेना. तेव्ह अंगदानें मंदोदरीस तेथें आणवून नागवें उघडें करून रावणाचे अं गावर लोटलें. असा त्या साध्वीचा छळ होतांच ती संतापानें ह्म णाली, आग लागो ह्या अनुष्ठानाला. तें ऐकतांच रावणानें डोळे उघ डले. आणि असा विपरीत प्रकार पाहून त्यानें भराभर वानर धरून आपटले, अंगद व मारुति ह्यानांही ठणकावलें. परंतु आपलें कार्य झाले असें जाणून अधिक प्रसंग न करितां वानर तेथून पळाले. रावणास ह्या वेळीं फारच वाईट वाटून मंदोदरीस वस्त्रें नेसवून ह्मणाला, आतां वांचलों तरच पुन्हा भेट असें सांगून तीस परत लावून उरलेले वीर घेऊन युद्धास आला. हा आतां अखेरचाच संग्राम ! ह्या प्रसंगीं गुरूच्या आज्ञेनें इंद्रानें आपला रथ रामाकडे पाठविला. तेव्हां रामचंद्र रथावर चढले. आणि तत्काळ द्वैरथयुद्धास आरंभ झाला. तेव्हां अशी कांहीं घनचक्कर झाली कीं, घोड्याशीं घोडे भिडून दोन पायांवर उभे राहिले. परंतु दोघेही सारथी चतुर, त्यांनीं त- त्क्षण रथ मागें घेतले. आणि अहोरात्र दोघांचें युद्ध झालें. नंतर रामचंद्रानें रावणाचीं मस्तकें उडवलीं, तरी तीं पुन्हा उत्पन्न झालीं. असें एकदोन वेळ होऊन गेलें. तेव्हां मातलीनें सांगितलें कीं, ह्याच्या पोटांत अमृतकुपी आहे तिचा नाश केला पाहिजे. तेव्हां रामानें अगस्तिदत्त बाण सोडला. तेणेंकरून ती अमृतकुपी नष्ट होऊन रावणाचीं तीन मस्तकें तुटून तो गतप्राण होऊन रथाखालीं कोसळला. असें पाहून रामचंद्रानें धनुष्यबाण लक्ष्मणाचे हातीं

ऊन आमचें अवतारकृत्य संपलें असें ह्मटलें. असो, ह्या वेळीं देवांनीं रामावर पुष्पवृष्टि केली.

पहा, परदाराभिलाषानें एवढाही रावण पण मुलांबाळांसह नाश पावून तो रणभूमीवर पडला, गिधाडांनीं त्याचे डोळे फाडण्यासही आरंभ केला. बिभीषणास येणेंकरून फारच शोक झाला, मंदोदरी आदिकरून साऱ्या स्त्रिया तेथें ऊर बडवीतच आल्या. मग रामचंद्रानें सर्वांचें समाधान करून त्यांस लावून दिलें. आणि बिभीषणाकडून रावणाच्या देहास मुक्ति दिली. नंतर लक्ष्मणाकडून मोठा समारंभ करवून बिभीषणास राज्याभिषेक करविला. बंदीचे सर्व देव सोडवून रावणानें ज्यांच्या ज्यांच्या अमोल्य वस्तु आणल्या होत्या त्या परत करविल्या. इतकें झाल्यावर सुवेळाचलीं शंकर, ब्रह्मदेव, इंद्रादि देव, ऋषि, गंधर्व, अप्सरा वगैरे रामचंद्राच्या दर्शनास आले. तेव्हां जिकडे तिकडे आनंदाचें पर्वच उसळलें. अप्सरा रामलीला गाऊन नृत्य करूं लागल्या, देवऋषि स्तोत्रें गाऊं लागले, व रामचंद्रानेंही सर्वांच्या भेटी घेऊन त्यांना आनंद दिला.

---

# उत्तरकांड.

## अध्याय चौतिसावा.

### सीतारामभेट.

रामचंद्र सुवेळाचळीं उंच पीठावर बसले आहेत, गंधर्व, किन्नर, अप्सरा नृत्यगायन करीत आहेत. तेतीस कोटी देव तेथें बसले आहेत, असा अनुपम देखावा पाहून वानर हर्षायमान होऊन गेले. तरी सीतामाई दृष्टीस पडल्यावांचून त्यांना गोड वाटेना. राम सीतामायीस केव्हां आण ह्मणतील ह्मणून मारुतिराय फारच उत्कंठित झाले होते. इतक्यांत मंगलस्नान घालून सीतेस आणण्यास रामानें त्यास सांगितलें. तेव्हां मोठ्या हर्षानें बिभीषणाकडे जाऊन मंगलस्नानाची तयारी करून अशोकवनीं गेला, नंतर रामाची आज्ञा सांगून त्रिजटा व सरमा ह्यांकडून मंगळस्नान घातलें. बिभीषणानें उत्तम वस्त्रालंकार दिले. नंतर त्यांस पालखींत बसवून कनाती सोडून रामचंद्राकडे घेऊन येऊं लागले. तेव्हां चेटीं वानरें एकापुढें एक घुसून पडदे वर करून पहात, त्यांना चोपदार, भालदार चांगलेच मार देत. तेव्हां त्यांनीं रामाकडे गाऱ्हाणें केलें. मग रामानें बिभीषणास हाक मारून सांगितलें कीं, वानरें आमचीं लेंकरें आहेत, त्यांना मारतां कामा नये, पडदे खुशाल वर करावे. त्याप्रमाणें बिभीषणानें कनाती काढून वानरांची हौस पूर्ण केली. त्यावेळीं सीतेचें रूप पाहून क्षुद्रजनांस असेंही वाटलें कीं,, असें रूपडें सहा महिने जवळ असून रावण उगाच राहिला असेल काय? राम अंतर्साक्षी भगवान्. त्यानें तत्काल सीतेस पुढें करून

डोळे वटारून ह्मटलें, हे जनकराजकुमारी ! दुष्टापासून तुला सोडवून आह्मीं आपला अपवाद दूर केला. आतां तुला दाही दिशा मोकळ्या आहेत, लागेल तिकडे जा. मला कैकेयीनें हांकलून दिलें, ना घर ना दार. तुला घेऊन आणखी कोणकोणाशीं तरी झगडा करूं ? तूं मला नकोस. ह्या वेळीं सारें आभाळच कडकडून पडलें असें जानकीस वाटलें. तिनें फारच शोक केला, नंतर मी दिव्य करतें, असें बोलून तिनें प्रचंड अग्नि पेटवून आंत उडी टाकली. नंतर कांहीं वेळानें पूर्वीपेक्षांही दिव्यरूपानें बाहेर आली. तेव्हां सर्व लोक तिला स्तवूं लागले. रामचंद्रानें तिला मांडीवर घेतलें. आणि मग एकच जयजयकार झाला. नंतर शंकरब्रह्मदेवांनींही रामाचीं स्तोत्रें गायिलीं, इंद्रानें रामचंद्राची आज्ञा घेऊन अमृतवर्षाव करून सर्व वानर उठविले. आणि त्यांचीं वनें सुफलित केलीं. मग सर्व देव परत गेले, आणि रामचंद्र, बिभीषण व सर्व वानरसैन्य अशी मंडळी पुष्पकविमानांत बसून अनेक प्रकारचीं वाद्यें वाजवीत अयोध्येकडे यावयास निघाली.

---

## अध्याय पसतिसावा.

### रामचंद्र अयोध्येस येऊन सर्वांच्या भेटी घेतात.

पुष्पकांतून जात असतां लंकेपासून अयोध्येपर्यंत ज्या स्थळीं जें जें केलें तें तें तीं तीं स्थळें जानकीस दाखवून सांगत होते. येतां येतां त्यानें अगस्तीचें दर्शन घेतलें. सीता व लोपामुद्रा ह्यांचीही भेट होऊन क्षणमात्र विनोदाचें भाषण झालें. बोलतां बोलतां सीता 'रामानें

समुद्रावर सेतु बांधला ' असेंही गर्वानें बोलून गेली. तोंच लोपा-मुद्रा ह्मणाली, कशाला रामानें एवढी खटपट केली, माझ्या पतीनें तर समुद्राचा एकच घोट केला. ही गोष्ट लोपामुद्रेशीं बोलूं नको; तुझा पाणउतारा होईल असें रामानें आधींच सीतेला सांगून ठेवलें होतें, तें हें बोलणें ऐकतांच तिला आठवलें. मग ती ह्मणाली, रामानें एका बाणानें तर सातही समुद्र आटले असते, आणखी तो द्विजपुत्र, त्याला पवित्र वानर स्पर्श करणारे नव्हत म्हणून रामाला असें करावें लागलें. असें बोलून कसें तरी तिनें वर तोंड केलेंच. असो. मग राम तेथून निघून भारद्वाजाश्रमीं गेले. नंतर तेथून मारुतीस आपण आल्याबद्दलची सूचना द्यावयास पाठ-विलें. त्याप्रमाणें मारुतीनें प्रथम गुहकास भेटून त्याचें समा-धान केलें. तो भरताप्रमाणेंच व्रतस्थ होता. त्याला हे शब्द अमृतापेक्षांही गोड वाटले. त्यानें मारुतीचे खूप आभार मानले. आणि मग दोघेही भरताकडे गेले. रामाचा तोच संकेतवेळ होता. त्यामुळें भरत कुंड पेटवून आंत उडी टाकण्याच्या बेतांत आहे तोंच ' हा आला रामचंद्र, अशी मारुतीनें किंकाळी फोडली. तेणेंकरून त्या आसन्नमरणरोग्यास हें अमृतच प्राप्त झालें. तो धांवत येऊन मारुतीस भेटला. नंतर मारुतीनें त्यास कच्चें वर्तमान सांगितलें. तें ऐकून भरतानें शत्रुघ्नाकडे हें वर्तमान अयोध्येंत पाठविलें. तों ति-कडे वसिष्ठ, कौसल्या, सुमित्रा, सुमंत ह्यांस हें वर्तमान कळतांच त्यांनाही परम आनंद झाला. आणि सोळा पद्म सैन्यासह नौबदा ठोकीत ती सर्व मंडळी नंदिग्रामीं रामदर्शनार्थ निघून आली. अ-शाच खटपटींत तो दिवस व रात्र गेली, नंतर उजाडलें नाहीं तोंच भरत हनुमान पुढें गेले. तोंच बिभीषणाच्या अठरा पद्में वाद्यांच्या

गजरासह आकाशांतून तें प्रचंड विमान येत असलेलें पाहून भरत ह्मणाला, हनुमंता! हेंरे काय? मारुति ह्मणाले, हेच ते रामचंद्र येतात इतक्यांत रामानेंही विमान तेथें उतरलें. नंतर रामचंद्रानें आधीं आपल्या जन्मभूमीस नमस्कार केला; आणि मग भरत व रामचंद्र ह्यांचें दृढालिंगन झालें. ते दोघे अगदीं एकवटून अश्रूंनीं एकमेकांस न्हाणिलें. तें बंधुप्रेम पाहून सुग्रीवास वाटलें, ह्याचें नांव बंधु. नाहीं तर आह्मी बंधु. बंधुप्राणहरणानें मीं अपकीर्तिच जोडली. उगीच रामचरणाचा आश्रय केला ह्मणून लोकांत तोंड दाखवायाला जागा राहिली. असो, मग भरतलक्ष्मणांचीही गांठ झाली. सुग्रीव, बिभीषण, ह्यांसही भरत भेटला. रामानें गुहकालाही आलिंगन दिलें. नंतर भरत, गुहक, हनुमंत ह्यांस विमानांत घेऊन रामचंद्र नंदिग्रामीं आले. नंतर सर्व लोक खालीं उतरल्यावर, रामानें पुन्हा हाक मारूं तेव्हां यावें असें सांगून पुष्पकास कुबेराकडे रवाना करून दिलें. नंदिग्रामीं वसिष्ठ, कौसल्या, सुमित्रा, सुमंत, शत्रुघ्न ह्यांच्या भेटी झाल्या त्या वेळींही बराच शोकरस माजला. सीताही आपल्या सर्व सास्वांस भेटली. कौसल्येनें आपल्या बोटांतली आंगठी आणि सुमित्रेनें आपल्या कंठांतील रक्तमाला सीतेस दिली व कैकेयी ह्मणाली, सीते! मूर्ति लहान पण कीर्ति फारच मोठी केली. रावणाची संपत्ति भोगून आलीस, असें बोलली. मग सीता कौसल्येजवळ मुकाट्यानें जाऊन बसली. ह्याप्रमाणें ह्या वेळीं रामाच्या सर्वांच्या भेटी होऊन सर्वांस परम आनंद झाला.



# अध्याय छत्तिसावा.

## श्रीरामराज्याभिषेक.

रामचंद्र तीन रात्र नंदिग्रामींच राहिले. तेव्हां सुमंत व शत्रुघ्न यांनीं शेंकडों किनखापी शिबिरें उभविलीं होतीं. रामासाठीं तर फारच मोठें शिबिर केलें होतें. तेथें बहुतेक खाशी मंडळी राहिली. अठरा पद्में वानरदळ, बाहात्तर कोटी रीस, छपन्न कोटी गोळांगुळें, शिवाय बिभीषणाचें सैन्य ह्या सर्वांस पुरून उरतील एवढीं शिबिरें तयार केलीं होतीं. शिवाय रामचंद्र परत आले असें ऐकून केक राजे रामदर्शनास आले. दर्शनप्रसंगीं राजांची तरी केवढी दाटी, त्यांच्या मुकुटावर मुकुटें आपटून रत्नें विखरून पडत होतीं. असो, जनकही तेथें आला होता. रामानें फारच प्रेमानें त्याचें दर्शन घेतलें. ऋषीही तेथें बहुत आले होते. त्यांचेंही यथायोग्य रामानें आदरातिथ्य केलें. नंतर रामानें प्रथम गुरूला मंगलस्नान घालून नंतर सर्वांनीं मंगलस्नानें केलीं. रामाचें मंगलस्नान होतांच भरतानें मस्तकावरील पादुका रामचरणीं घातल्या. सीतेनेंही आपल्या तिन्ही बहिणींसह मंगलस्नान केलें. सर्व उत्तम प्रकारचीं वस्त्रें व अलंकार ल्यायले. नंतर सर्वांचीं भोजनें उरकलीं. ह्याप्रमाणेंच तीन दिवस लोटल्यावर पुण्यार्कयोग पाहून मोठ्या समारंभानें रामचंद्र अयोध्येकडे चालले. तेव्हां वाजंत्र्यांचा एकच गजर सुरू झाला. रामानें महाद्वारीं जातांच श्रीगणेशसरस्वतीचें पूजन केलें. नंतर आंत प्रवेश केला. अयोध्येची रचना, तेथील सदा सुफलित वृक्ष, लोकांची पुण्यशीलता पाहून रीस, वानर, राक्षस ह्यांचीं मनें थक्क झालीं.

ह्यानंतर शुमुहूर्त पाहून वसिष्ठानें श्रीरामास राज्याभिषेक केला. रामानें आपल्या त्रिवर्ग बंधूंसही युवराज्याभिषेक केला. आणि त्यांच्याच अनुमत्तानें राज्य चालविण्याचें ठरविलें. असो, राजेलोकांनीं ह्या प्रसंगीं करभाराच्या राशी पुढें मांडल्या. भोजनोत्तर सर्व राजांस आहेर देऊन बोलाविलें. तरी सोळा दिवस तो उत्साह चालूच होता. रामचंद्र सिंहासनावर बसतांच भरतशत्रुघ्न चामरें घेऊन वारीत असत, तें गवाक्षद्वारानें कैकेयीनें पाहून वसिष्ठाजवळ ह्मटलें, पहा अभद्या कपाळाचें कारटें, चौदा वर्षें अरण्यांत राहून आतां आणखी चाकर झाला. तें ऐकून वसिष्ठानें खूपच तिची खरडपट्टी काढली.

सर्व राजेलोक गेले तरी बिभीषण व सुग्रीव राहिलेच होते. एक महिना झाला तरी त्यांचा पाय निघेना. शेवटीं रामानें अनेक प्रकारें त्यांचें समाधान करून त्यांचेसाठीं एक वेगळीच मेजवानी देऊन त्यांना परत लावूं लागला. तेव्हां सर्वांना रामानें यथायोग्य वस्त्रालंकारांनीं मंडित केलें. फक्त मारुति राहिला, त्याला काय द्यावें हेंच रामाला सुचेना. तेव्हां राम ह्मणाले, मी सदोदित तुझ्या हृदयांत राहीन. मारुति ह्मणाले, मलाही हेंच पाहिजे. तरी सीतेनें पृथ्वीच्या मोलाचा एक रत्नहार त्याच्या कंठांत घातला. पण तो ती काय, त्यानें कडाकड ते हिरे फोडून आंत राम न दिसल्यामुळें ते सारे भिरकावून दिले. त्याला हें असें काय करतोस ह्मणून कितीएकांनीं विचारतां त्यानेंही आपला हेतु सांगितला. तेव्हां लोक ह्मणाले. तुझ्या तरी पोटांत राम आहे का? मारुति ह्मणाला नसेल तर हें हृदय मी ठेवितों कशाला, असें बोलून नखें खुपसून त्यानें आपलें पोट चिरलें, तोंच सिंहासनस्थ राममूर्तिप्रमाणेंच त्याचे हृदयांत

राममूर्ति सर्वांनीं पाहिली ! असो. ह्यानंतर सकल सेनेसह लंका व किष्किंधापतीस रामानें नगराबाहेर येऊन बोळविलें. मारुतिराय मात्र तेथें राहिल. रामानें अकरा हजार वर्षें राज्य केलें. त्या काळीं दुःख, जरा, मरण कसें तें कोणास ठाऊक नव्हतें. भगवंतानें उदंड अवतार धारण केले पण हा कांहीं थाटच वेगळा. रामचंद्र अगस्तिमुखानें सदां वेदांत श्रवण करून आनंदानें काल घालवीत असत.

---

## अध्याय सदतिसावा.

### अश्वमेध.

रामचंद्र आनंदानें राज्य चालवीत असतां, सीतामायीस कांहीं महिने लोटले. तेव्हां रामानें शास्त्रविदित संस्कार व डोहाळजेवणें उत्तम प्रकारें चालविलीं. एक वेळ वसंतऋतूंत वनांत भोजनास गेला असतां रामानें एकांतीं सीतेस तिचे डोहोळे विचारले. तेव्हां ती ह्मणाली, पांच रात्री वनांत राहून ऋपिपत्न्यांची पूजा करावी असा हेतु आहे. राम ह्मणाले, अझून तुझी अरण्याची हौस पुरली नाहींना? असो; पूर्ण करीन. ह्यानंतर राम परत आल्यावर एके दिवशीं त्यांनीं हेरांस गांवांतील समाचार विचारला. तेव्हां एकजण ह्मणाला, सर्व लोक आपली स्तुति करतात परंतु एक परीट मात्र एकदां फारच वाईट बोलला. त्याची बायको एकदां रुसून माहेरीं गेली, ती कितीएक दिवस बापाचे घरींच राहिली. तेव्हां तिचा बाप तिला घेऊन आला असतां तो ह्मणाला, मी हिला घरांत घेणार नाहीं. मी तो राम नव्हे. रावणाचे घरीं सहा महिने बायको रा-

हिली. असतां तिला घरांत घेऊन आनंद करतो तसा मी नाहीं. इत्यादि हेराचें भाषण ऐकून रामानें सीतेस अरण्यांत नेऊन टाकण्याबद्दल कारण सांगून लक्ष्मणास आज्ञा केली. तेव्हां तो मोठ्या दुःखानेंच सीतेस वनगमनाची तयारी करावयास सांगून रथ आणावयास गेला. सीतेस वाटलें, राम आपली इच्छा पूर्ण करतात ह्मणून ऋषिपत्न्यांस पुजण्याचें तिनें सर्व साहित्य तयार केलें. रथ येतांच रथांत बसून चालती झाली. तिला हा प्रकार ठाऊक नसल्यामुळें ती आनंदांतच होती, परंतु लक्ष्मणाच्या काळजानें ठाव अगदींच सोडला होता. तो कांहींएक न बोलतां रथ घेऊन चालला. नंतर नदी लागतांच तसाच रथ नावेंत घालून घोर वनांत चालता झाला. ह्या प्रसंगीं सीतेस अपशकूनही बरेच झाले, आणि ऋषीच्या आश्रमाच्या खुणा न दिसल्यामुळें व वेदघोष न ऐकूं आल्यामुळें तिचें मन उदास होऊन रथ हा चालविला कोणीकडे असें ती लक्ष्मणास विचारूं लागली. परंतु लक्ष्मणानें कांहींच न बोलतां घोर अरण्यांत रथ नेला. नंतर तृणशय्या रचून सीतेस तेथें उतरविलें. आणि मोठ्या दुःखानें रामाची आज्ञा तिला सांगितली, तेव्हां ती बेहोष होऊनच पडली. मग लक्ष्मणानें आपले उरावर धोंडा ठेवून तत्काळ रथ मागें चालविला. कांहीं वेळानें सीता सावध होऊन जवळ कोणी नाहीं असें पाहतांच तिनें जो तेथें आक्रोश मांडला तेणेंकरून सर्व अरण्य शोकमयमान होऊन गेलें. अशा प्रकारें ती रडत असतां वाल्मीकीची व तिची अकस्मात् गांठ होऊन त्यानें तिचें समाधान करून तिला आपले आश्रमांत नेलें. तेथें ऋषिपत्न्यांच्या सहवासानें ती आपलें दुःख विसरत चालली. पुढें नऊ मास भरतांच ती आवळे जावळे दोन पुत्र प्रसवली. तेव्हां वाल्मीकीनें त्यांचें जातकर्म

करून वडिलाचें नांव कुश व धाकट्याचें नांव लहु असें ठेवलें. पुढें तीं मुलें जसजशीं मोठीं होत चाललीं तसतसें ऋषीनें त्यांस सर्व प्रकारचें शिक्षण दिलें. धनुर्विद्येंत तर रामाप्रमाणेंच वाल्मीकीनें त्यांस प्रवीण केलें. नंतर त्यांचीं उपनयनें केलीं. पुढें तीं मुलें नित्य शिकार करूं लागलीं. ह्या योगानें एक वेळ त्यांच्या हातून वाल्मीकाचा बंधु हरिणरूपानें मारला गेला. ही त्यांना ब्रह्महत्या घडली ह्मणून तिच्या शांतीकरितां श्रीरामाच्या बागेंतील सहस्र सुवर्णकमळें आणण्याबद्दल ऋषीनें त्यांस आज्ञा दिली. तीं मुलें मोठीं पटाइत. त्यांनीं तेथील रक्षकांस पराक्रमानें हुसकून देऊन कमळें आणलीं. नंतर ऋषींनीं शिवपूजा करवून त्यांचेकडून शांति करविली. एक वेळ आपण कोणाचे, आमचा वंश, गांव कोणचा वगैरे सारा मजकूरही त्यांनीं सीतेस विचारून ठेविला होता. व तो मजकूर ऐकून सीतेस रानांत टाकल्याबद्दल रामलक्ष्मणांची खोडकी जिरविण्याविषयीं त्यांनीं मनाशीं गांठ देऊन ठेवली होती.

इकडे अयोध्येकडे सीतेस अरण्यांत टाकल्यापासून जिकडे तिकडे अगदीं उदास होत चाललें, अयोध्यानगरी भणभणीत दिसूं लागली, व पर्जन्यवृष्टिही क्वचित् कधीं कधीं होत असे. येणेंकरून लोक सदा दुःखी असत, तेव्हां सीतेस अरण्यांत टाकल्याचाच हा प्रकार असें बहुतेकांस वाटलें. नंतर अगदींच अवर्षण झाल्यामुळें वसिष्ठानुमतें अश्वमेध करण्याचा विचार ठरवून सुग्रीव, जांबुवंत, बिभीषण ह्यांस रामचंद्रानें बोलावून घेतलें; आणि सुवर्णाची सीता करून दीक्षा घेऊन शामकर्ण पृथ्वीवर सोडला. त्याचे मस्तकीं अशी पत्रिका बांधली होती कीं, सूर्यवंशीय दाशरथि रामचंद्रानें हा अश्व सोडला आहे, त्याचा कनिष्ठबंधु शत्रुघ्न ह्या अ-

श्वाचें . रक्षण करीत आहे, सामर्थ्य असेल त्यानें हा अश्व धरावा. ह्याप्रमाणें तो अश्व चालू होऊन सर्व पृथ्वीप्रदक्षणा करून बारा दिवसांत वाल्मीकीच्या आश्रमावर येऊन पोंचला. त्या वेळीं पाताळीं वरुणानें यज्ञ चालू केला होता, तिकडे वाल्मीकमुनि गेले होते; जातांना लहु व कुश यांस आश्रमाचें रक्षण करण्यास सांगितलें होतें. अश्व आश्रमाजवळ आला तेव्हां लहु कांहीं ऋषिबाळांसह तेथें खेळत होता, त्यानें तो घोडा धरून कर्दळीवनांत बांधून ठेवला. पोरें त्यास आडवीं आलीं असतां तो ह्मणाला, काय तेच वीर आहेत काय ? माझा हा घोडा आहे, येऊं दे कोण येतो तो !

---

## अध्याय अडतिसावा.

### लहुकुशआख्यान.

इकडे अश्व न दिसल्यामुळें वीर घाबरून शोध करूं लागले. तेव्हां हीं पोरें ह्मणालीं, तो पहा पोरगा, त्यानें घोडा धरला. तो मोठा कटकट्या आहे. तें ऐकून कौतुकार्थ घोडा पोरानें धरला असें समजून वीर तो सोडवूं लागले. तेव्हां लहूनें बाण मारून वृक्षपर्णाप्रमाणें पटापट सर्वांचीं मणगटें तोडलीं. तेव्हां मग युद्ध करणेंच भाग पडून सर्वच वीर त्यावर धांवले, परंतु लहूनें बहुतेकांस तर मुक्तिच दिली. शेवटीं शत्रुघ्न त्याचे अंगावर धांवला. त्यालाही त्यानें जर्जर केलें. तरी त्याच्या एका तीव्र बाणानें हें पोर मूर्च्छित पडलें. मग शत्रुघ्नानें त्यास आपल्या रथांत घेऊन अयोध्येचा मार्ग धरला, ही बातमी पोरांनीं सीतेस कळविली. तेणेंकरून ती तर बेहोष पडली. कांहीं वेळानें सावध होऊन तिनें आक्रोश करून

रा आश्रम गाजवून टाकला. तिला वाटलें, माझा एक डोळा दु-ष्टानें फोडून टाकला. अशा प्रकारें ती शोक करूं लागली. कुश हा त्या वेळीं वनफळें आणण्यासाठीं दूर रानांत गेला होता, एव-ढ्यांत इकडे इतका प्रकार झाला. तो परत येत असतां मातेचे शोक-शब्द ऐकून मोठ्या भयानेंच तिचे जवळ आला, तिनें त्याला पाह-तांच सर्व मजकूर त्यास कळविला. तो ऐकतांच त्या क्षात्रकुमाराचे ठायीं पूर्ण वीरश्री आली. नंतर मातेचें समाधान करून तो सिंहा-सारखा उडून ह्या सैन्यास आडवा आला. आणि क्षणाचाही विलंब न करितां सर्व सैन्याची राळ करून शत्रुघ्नास गाढ मूर्च्छित करून घोडा व लहु यांस घेऊन आला. नंतर ते दोघेही महावीर पुन्हा कोणी वीर येतील ह्मणून वाट पहात राहिले. ह्या वेळीं त्यांचीं धनुष्यें मो-डलीं होतीं, ह्मणून त्यांनीं सूर्याची स्तुति करून अक्षय्य धनुष्यभाते मिळवून वीरश्रीनें चहूंकडे जिकडे तिकडे मिरवत होते.

इकडे घायाळांनीं हें वर्तमान रामास कळवितांच त्यास फारच दुःख झालें. त्यानें मग लक्ष्मणास इकडे पाठविलें, त्या वेळीं या दोघां पोरांनीं घोर युद्ध करून सारें सैन्य ठार केलें. आणि मग कुशानें लक्ष्मण हा शेषअवतार जाणून नादास्त्र त्यावर सोडलें. त्याचा मंजुळ नाद लक्ष्मणाचे कानीं भरतांच तो तेणेंकरूनच चलनवलनरहित प-तन पावला. हें वर्तमान रामाचे कानीं जाण्याचे पूर्वीच ह्या दोघां पो-रांस ठार न करतां फक्त बांधून आणावें हें सांगण्यासाठीं रामचंद्र भरतास पाठवीत होता. तों हें वर्तमान त्याचे कानीं गेलें. तेणेंकरून तर त्याला अनिवार दुःख झालें.

---

# अध्याय एकोणचाळिसावा.

## पुत्र पित्याचा पराभव करितात.

लक्ष्मण जो इंद्रजिताचा हंता, त्याचाही पोरांनीं असा परिणाम केला. हें जाणून हनुमंत व भरत ह्यांचेबरोबर अपार सैन्य देऊन रामचंद्रानें त्यांना पाठविलें. तों हे राघवीय वीर तयारच. ह्यांना पहातांच मारुति व भरत ह्यांची पक्की खात्री झाली कीं, हे सीतेचेच आवळेजावळे पुत्र खचित. ह्मणून स्नेहानें त्यांचीं मनें द्रवून ते त्यांना तुह्मी कोणाचे कोण? असें विचारूं लागले. तेव्हां कुश ह्मणाला, घाबरलास काय, ह्मणून गोड गोड बोलतोस? पण मी तुला आतां अयोध्येस जाऊं देणार नाहीं. असें बोलून दोघेही युद्धास प्रवर्तले. आणि हां हां ह्मणतां सर्व सैन्य पाडून तीव्र बाणवायानें हनुमंत व भरत ह्यांनाही गाढ मूर्च्छित पाडून पुन्हां आपले उड्या मारीत उभेच! हें वर्तमान रामास कळतांच सीतात्यागानें आमचा पराक्रम नष्ट झाला असें त्यास वाटून तो फारच घाबरला आणि मग बिभीषण, सुग्रीव, वानरसैन्य, जांबुवंत वगैरे सर्वांसह रामचंद्रही युद्धास आला. तेव्हां तिघां बंधूंची अवस्था पाहून रामास फारच दुःख झालें. मग क्षणमात्र दुःख गुंडाळून ठेवून तोही युद्धास प्रवर्तला, परंतु ह्या दोघांनीं प्रथमतः बहुतेक वानरसैन्याची तर वाट लावलीच. इतक्यांत मारुति उड्डाण करून ह्यांस धरण्याच्या विचारांत होता, तोंच त्यावर कुशानें वज्रप्राय एक बाण टाकून त्यास मूर्च्छित पाडून, ह्मणाला, रे माकडा, मी अशोकवनांतलें झाड नाहींहो, पड तसाच; मी कांहीं द्रोणपर्वत नाहीं कीं तूं मला उचलून नेशील. हनुमंत पडतांच सुग्रीव धांवला. त्यास कुश ह्मणाला रे, तुमचा तो मागचा

काळ गेला बरें, भावास मारून त्याची बायको उपटणाऱ्या तुला शिक्षाच केली पाहिजे. तूं तर जनावरच, पण तुला गुरु नामी मिळाला. असें बोलून त्यालाही पाडलें. जांबुवंताचीही अशीच वाट लावली; नंतर नळ अंगावर येतांच येथें सेतु बांधायाचें काम नाहीं, असें बोलून त्याचीही वाट लाविली. नंतर अंगद धांवला; त्याला ह्मणाला हारे जारिणीपुत्रा! तूं मला शरण ये ह्मणजे मी तुझ्या बापाबद्दलचा सूड उगवतों, येथें रावणाचा मंडप नाहीं कीं, तोच मी ह्मणून मला उचलून नेशील, असें बोलून त्याचीही वाट लाविली.

रामचंद्र ह्यांचीं भाषणें ऐकत व पराक्रम पहात इतका वेळ निवांत उभे होते. हीं दोन्ही लहान सुकुमार कोमळ बाळें, लंगोटीवांचून अंगावर दुसरें वस्त्र नाहीं, शेंडी भुरभुर उडते आहे, असें असून तीव्र कवच धारण केल्याप्रमाणें ज्यांचीं दिव्य शरीरें चमकत आहेत, हें पाहून व त्यांच्या आंतड्यांस हे आपल्याच वंशाचे हिरे असें कळल्यामुळें प्रीतीनें ते अगदीं आर्द्र होऊन गेले होते. परंतु ह्यांचा असा पराक्रम पाहून ते बाण सोडीत पुढें धांवले. ते बाण येतांच पोरें त्यांना वरचेवर तोडीत, एखादा आलाच तर पोरांस न लागतां भलतीकडेच पडे. असें पाहून रामाचा पराक्रम नष्ट झाला असें देव मानूं लागले. रामालाही असेंच वाटलें. मग तो ह्मणाला बाळांनो! मी तुह्मांस प्रसन्न आहें, तुह्मांस मी पुष्कळ खाऊ, डागिने देईन, हत्ती, घोडे, रथ लागेल तें देईन व पुढें जों बोलणार तोंच कुश ह्मणाला, मीच तुला प्रसन्न आहें, तुलाच लागेल तें माग. तुझी कीर्ति मला ठाऊक आहे, तूं मोठा पापी, निर्दय आहेस, तूं आपली पवित्र बायको उगाच रानांत टाकून दिलीस. हें ऐकून तर चटकन्

ह्यांना प्रोटाशीं धरून चुंबन घ्यावें असें रामास वाटून तो ह्मणाला, बरें असो. तुमचा गुरु कोण, तुह्मी कोणाचीं मुलें हें तर सांगतां? तेव्हां दोघे गदगदां हंसून ह्मणाले, तुला हें विचारण्याचें कारण काय? बंधु रणांत पडले त्यांचा सूड उगव. उगाच कशाला सोयरीक विचारतोस? भ्याला असशील तर पळून जा. तुला ना बायको, ना पोर, संन्यास कां घेईनास. तुला ऐकणेंच असेल तर सांगतों. आह्मी रामभटजीचीं मुलें, आईचें नांव अर्थातच जानकी, वाल्मीकि हाच आमचा गुरु. हें ऐकतांच सीतेची आठवण होऊन राम अगदीं विव्हळ झाला. नंतर मारुति व बिभीषण ह्यांसह एका झाडाचे आड बसून हीं जानकीचींच लेंकरें काय ह्याबद्दल विचार करीत बसला. तेव्हां सीतात्यागापासूनचे दिवस व ह्या मुलांचीं वयें ह्यांचा हिशेब करून हीं आपलींच मुलें अशी खात्री करवून क्षणमात्र निवांत राहिला. इतक्यांत कुशानें नेमकाच बाण मारून त्याच्याजवळचा वृक्ष दूर उडवून दिला. येणेंकरून रामास मोठें नवल वाटून तो ह्यांचे अंगावर बाण टाकूं लागला. इतक्यांत कुशानें मोहनास्त्र टाकून रामास मूर्च्छित पाडलें. आणि मारुति व लंकापति ह्यांनाही मूर्च्छित पाडलें. नंतर रामलक्ष्मणांचे मुगुट, कुंडलें व डागिने काढून दोघांनीं आपल्या अंगावर घातले. आणि गमतीखातर हनुमंत सुग्रीवादि आठ वीरांच्या शेंपट्या बांधून त्यांस ओढीत आश्रमाकडे गेले

आश्रमांत जातांच वानरांच्या शेंपटांनीं झाडांच्या खांद्यांस गांठी देऊन त्यांस उलटे टांगून दोघेही सीतेकडे धांवले. ह्या दोघांचीं रूपें हुबेहुब रामाप्रमाणेंच होतीं. व त्यांवर हे अलंकार त्यांच्या अंगावर असल्यामुळें तर स्वयंवरप्रसंगीं शोभलेल्या रामाप्रमाणेंच हे दिसूं

लागले. तेव्हां मीही त्याचवेळची असें घटकाभर सीतेस वाटून ती लाजून पदर सरसावूं लागली. तोंच दोघांनीं तिला नमून सर्व मजकूर सांगितला. तें ऐकतांच पतिदुःखानें ती आक्रोश करूं लागून पोरांसही दोष देऊं लागली. तेव्हां हे ह्मणाले, आई रडूं नको? ते मूर्च्छित होऊन पडले आहेत, आतां सावध होतील, घाबरण्याचें कारण नाहीं. असो, पण आई! आह्मीं सात आठ वानरें आणलीं आहेत! आई कायगे तीं उड्या मारतात, पण पहा तीं झाडाला टांगून ठेवलीं आहेत; पहा तर खरी. असें ह्मणून त्यांनीं तिचा हात धरून तिला आश्रमाबाहेर आणलें. तेव्हां हनुमानसुग्रीवांस पाहतांच सीता पोरांच्या पराक्रमानें अगदींच थक्क होऊन गेली. मग ह्यांस ओळख देणें ठीक नाहीं असें जाणून तिनें पोरांस सांगितलें कीं, हीं घरांत ठेवूं नयेत. हीं मोठीं खोडकर असतात. हीं लंकेस गेलीं तेव्हां रावणाचा नाश झाला. अयोध्येस गेलीं ह्मणूनच तेथल्या राजाचा असा पराभव झाला. ह्यांना सोडून द्या. तें ऐकतांच दोघांनीं त्यांना सोडून दिलें, तेव्हां ते धूम रामाकडे पळत जाऊन ह्मणाले, प्रभो! हे दोघे आपलेच कुमार आहेत. सीतामाई आह्मीं तेथें पाहिल्या. तेव्हां राम सावध झाले होते. ते हें ऐकून मुकाट्यानें बसले.

इकडे वाल्मीकीच्या शिष्यांनीं हा सारा प्रकार त्यांस कळवितांच ते धांवून आले. तेव्हां सीतेनेंही सर्व कांहीं त्यांना कळविलें. मग त्यांनीं अशी अद्भुत करणी केली कीं, कमंडलूंतील पाणी शिंपडून एकंदर सारें सैन्य उठविलें. कोणाच्या अंगावर घाव पण उरला नाहीं. नंतर रामचंद्रास आलिंगन देऊन त्याचें सांतवन केलें. आणि उभयतां मुलांसह सीता त्याचे हवालीं केली. तेव्हां 'हे प्रभो! हीं

दोन्ही मुलें तुझींच असून सीता निष्कलंक आहे ' अशी आकाशवाणी झाली. तेव्हां रामानें पुत्रांस जवळ घेतलें. तेणेंकरून त्यालाच परमानंद झाला असें नाहीं, तर तेथील वृक्षपाषाणांलाही आनंद झाला. नंतर वाल्मीकीसह रामचंद्र अयोध्येस जाऊन त्यांनीं यज्ञाची समाप्ति केली. सुग्रीव बिभीषणादिक सर्व राजांस यथायोग्य अहेर देऊन सर्वांस मोठ्या प्रेमानें बोळाविलें, व मग मात्र चिरकाल सुखानंदांत त्यांनीं आपलें राज्य चालविलें.

---

# अध्याय चाळिसावा.

## श्रीरामाचा सर्वत्र विजय.

एकदां श्रीरामचंद्र सिंहासनावर विराजमान असतां यमुनातीराकडील बहुत लोक रामचंद्राकडे येऊन गाऱ्हाणें सांगूं लागले कीं, सांप्रत मरुदैत्याचा पुत्र लवणासुर हा फार उन्मत्त झाला आहे, तो महादुष्ट आहे, त्यानें गायी, ब्राह्मण खाण्याचा एकसारखा फार सपाटा मांडला आहे, मथुरापट्टण तर त्यानें ओसच पाडलें, येणेंकरून आह्मी सारे दीन होऊन गेलों आहोंत. हें ऐकून रामानें तीन अक्षौहिणी सैन्यासह शत्रुघ्नास त्याचेवर पाठविलें. तो यमुना उतरून पलीकडे जातांच कितीएक ब्राह्मणांनीं शत्रुघ्नास सांगितलें कीं, युद्धानें आधींच हा दैत्य हातीं येणार नाहीं. त्यानें शंकराची आराधना करून त्यापासून एक शूळ मिळविला आहे. तो एकदां त्यानें हातांत घेतला कीं, त्रैलोक्यांतील सारेच वीर त्यापुढें हात टेंकतात. मांधाता राजा ह्यानेंच मारला. तो तो शूळ घरांत ठेवून शिकार

शोधावयास जात असतो. ती संधि पाहून तेवढा शूळ आधीं हस्तगत करून घे, मग दुसरी गोष्ट. एवढें ऐकून शत्रुघ्न बेताबेतानें त्याचा शोध ठेवीत पुढें चालला. आणि शूळ घरांत ठेवून तो शिकार शोधण्यास गेला, असें कळतांच शत्रुघ्नानें बेधडक घरांत शिरून तो शूळ हातीं घेतला, आणि मग सैन्याकडून त्याच्या मंदिरास वेढा घालून त्याची वाट पाहत बसला. कांहीं वेळानें तो दैत्यही गाई व मनुष्यांची मोळी डोक्यावर घेऊन आला; तेव्हां आपल्या घराजवळ मनुष्यांची गर्दी पाहून ही ईश्वरानें आयतीच दहावीस दिवसांची बेगमी आपल्यास पाठविली असें मानून तो अत्यंत आनंदित झाला. नंतर नाचत नाचत पुढें येतो तों शत्रुघ्नाचे हातीं आपला शिवदत्त शूळ पाहून अंमळ कचरला. शत्रुघ्नास तो जाणत होताच. तेव्हां डोक्यावरील तो मांसभार एकीकडे टाकून एकदम किंकाळी फोडून ह्मणाला, रे मानवा ! तुझ्याच भावानें माझा मामा रावण हा मारला आहे. त्याचा सूड उगविण्यासाठीं मी वाटच पाहत आहें. आतां तुह्मां चौघां भावांस ठार करून सीता उपटून आणतों. असें बोलून जों शत्रुघ्नावर धांवत आहे तोंच रामचंद्रास ब्रह्मदेवानें एक दिव्य बाण दिला होता. तो इकडे येतेवेळीं रामानें शत्रुघ्नास दिला होता. तोच बाण त्यानें सोडून त्या दैत्याचें शिर उडविलें. अशा प्रकारें दैत्याचा ताप नाहींसा होतांच लोक सुखी होऊन आपापल्या स्थळीं राहिले. शत्रुघ्न हा मग मथुरेंतच कांहीं दिवस राहिला. रामचंद्रानें त्यास छत्रचामर सिंहासन पाठवून देऊन तेथचा राजाच केला.

ह्यानंतर एकदां एका ब्राह्मणाचा पुत्र मुंज होतांच मृत झाला. ह्मणून तो रामचंद्राकडे गाऱ्हाणें आणून ह्मणाला कीं, तूं कांहीं पातक आचरलेंस त्यामुळें माझा पुत्र मेला, तर तो मला सजीव करून

दे. हें ऐकून राम चिंताक्रांत होऊन गेले; इतक्यांत नारदऋषि रामाकडे आले. त्यांस रामानें ह्याबद्दल विचारतां ते ह्मणाले, कोणी तरी शूद्र तपाचरण करीत आहे. तप करणें हा शूद्राचा धर्म नाहीं, तर तूं ह्याचा तपास कर. तें ऐकून रामचंद्रानें पुष्पकविमानाचें स्मरण केलें, तोंच तें येऊन पोंचलें. मग रामचंद्र त्यांत बसून शोध करीत असतां दक्षिणारण्यांत कोणी किरात धूम्रपानेंकरून तपाचरण करीत आहे असें पाहून त्यानें त्याचा शिरच्छेद केला. तप करण्याचा त्याचा हेतु केवळ स्वर्गप्राप्तीचा होता, तो रामबाणानें आयताच सिद्धीस गेला. मिळून तपाचें फळ त्याला मिळावयाचें तें मिळालेंच. ह्या प्रसंगीं इंद्र रामचंद्रास भेटला व कांहीं सेवा सांगावी ह्मणून ह्मणूं लागला. तेव्हां ब्राह्मणपुत्र सजीव करून दे असें त्यास सांगून रामचंद्र अगस्तिदर्शनासाठीं त्याचे आश्रमीं चालले. तेव्हां एक गृध्र व एक उलूक ह्यांनीं त्याचें विमान थाबवून आमचा तंटा आहे तो निवडण्याबद्दल विनंति केली. सुमंत प्रधान रामचंद्राबरोबर होता, त्यासच त्यानें हा न्याय निवडण्यास सांगितलें. नंतर उलूकास विचारल्यावरून तो ह्मणाला, ह्या पलीकडच्या वृक्षावर माझें घर आहे तें ह्या गृध्रानें बळकावलें. गृध्र ह्मणाला, हा उलूक उगाच त्रास देत आहे. तें मुळचें माझेंच घर होतें. ही पृथ्वीही निर्माण झाली नव्हती तेव्हांपासून मीं त्या झाडावर कोठें बांधून ठेविलें आहे. उलूक ह्मणाला, पृथ्वी झाल्यावर हा वृक्ष वाढला. मग मीं येथें कोठें बांधलें आहे. हें ऐकून प्रधान ह्मणाला, गृध्र खरा आहे, हा फारच जुन्यां काळच्या गोष्टी बोलतो. राम ह्मणाला, वाहवा, मला तर तो मोठा लबाड वाटतो. पृथ्वीचे पूर्वीं वृक्ष वाढणार कोठें, अर्थात उलूकच खरा आहे. तर ह्या गृध्रास शिक्षाच केली पाहिजे. मग राम

त्यास मारणार तोंच आकाशवाणी झाली कीं, हा पूर्वींचा ब्रह्मदत्त राजा होता. श्राद्धप्रसंगीं ह्यानें एकदां गौतमऋषीला मांस वाढलें, तेव्हां ऋषीनें शाप देऊन तुझ्या दर्शनाबरोबर ह्याचा उद्धार होईल असें सांगितलें. असें आकाशवाणी बोलत आहे तोंच आकाशांतून विमान आलें. व गृध्रही पूर्ववत् दिव्यदेही होऊन रामचंद्राची स्तुति करून उद्धरून गेला. नंतर रामचंद्र अगस्तीचे आश्रमीं गेला. तेथें ऋषीनें त्याची पूजा करून एक दिव्य रत्नखचित कंकण रामाचे हातांत घातलें. तें पाहून राम ह्मणाले, ही मानवी कृति नाहीं. ब्रह्मदेवानेंच हें केलें असावें. अशी ही मनुष्यास दुर्लभ वस्तु आपणास कशी बरें प्राप्त झाली? तेव्हां ऋषि ह्मणाले, रामचंद्रा! विदर्भदेशाचा एक महापुण्यवंत राजा होता, त्यानें अन्नदानावांचून सर्व दानें केलीं होतीं, परंतु अन्नदान हेंच सर्वांत श्रेष्ठ आहे. ह्याचा परिणाम असा झाला कीं, मरणानंतर त्याला स्वर्गलोक तर प्राप्त झालाच, पण त्यास खावयास कांहीं मिळेना, तेव्हां ब्रह्मदेव त्यास ह्मणाला, दिल्यावांचून येथें कांहीं प्राप्त होणें नाहीं. तूं सर्व दानें दिलींस त्याप्रमाणें तुला येथें सर्व भोग मिळतातच, अन्नदान केलें नाहींस तर तुला येथें खावयास कोठून मिळणार? आतां तूं असें कर कीं, भूतळीं तुझा देह अद्याप पडला आहे, तोच तूं नित्य खात जा. तो खाण्यापासून त्याचें मांस वाढतच जाईल. आणि ज्या वेळीं तुला अगस्तीचें दर्शन घडेल त्या वेळीं तुझा उद्धार होईल. रामचंद्रा! ह्याप्रमाणें तो राजा नित्य विमानांत बसून ह्या येथेंच त्याचा देह पडला आहे तो खाण्यासाठीं तो येत असतां एक वेळ माझी त्याची भेट झाली. त्या वेळापासून तो आतां अमृतपान करून स्वर्गी खुशाल आहे. त्यानें गुरुदक्षिणा ह्मणून मला हें कंकण दिलें होतें. ह्याच्या रत्नांच्या

टायीं इंद्रादिकांचे अंश आहेत. तेव्हां चिंतित मनोरथ सिद्ध करणारें हें कंकण आहे. रामचंद्रा ! हें तुझ्या हातांत असावें ह्मणून मीं ही वस्तु तुला दिली. नंतर रामचंद्रानें दंडकारण्याची माहिती विचारल्यावरून अगस्ति ह्मणाले, मनूचा पुत्र इक्ष्वाकु व त्याचा पुत्र राजा दंडक; त्याचाच हा एकंदर प्रांत. तो एक वेळ मृगयेसाठीं हिंडत असतां भृगुऋषीच्या आश्रमीं गेला. ऋषि तेव्हां आश्रमीं नव्हता, त्याची आरजानामें एक दहा वर्षांची कन्या मात्र होती. तिला पाहतांच राजा कामातुर होऊन त्या पोरीवर बलात्कार करून गेला; तेणेंकरून ती अचेतन पडली. नंतर भृगु आश्रमीं येतांच त्याला आसपासच्या ब्राह्मणांनीं हें वर्तमान सांगितलें. तेणेंकरून त्यास परम कोप येऊन त्यानें शाप देऊन त्याचा सगळा प्रांत जाळून टाकिला. त्यावरून हें दंडकारण्य नांव पडलें. येथें पाण्याचा थेंब अथवा गवताचा कोंबही नव्हता. पुढें नारदानें पर्वतांमध्यें कलह लावून विंध्यपर्वतास खूप वाढावयास लाविलें. तेणेंकरून ह्या दक्षिणप्रांतीं सूर्याचा प्रकाशही येईनासा झाला. मग नारदानें मी काशीस असतां मला हें वर्तमान सांगून इकडे बोलावून घेतलें. विंध्य हा माझा शिष्य, मी इकडे येतांच मला नमस्कार करण्यासाठीं तो खालीं पडला तेव्हां मी परत येईपर्यंत असाच पडून रहा असें सांगून मी इकडे आलों; व येथेंच आश्रम करून राहिलों. नंतर इंद्राकडून येथें अमृतवर्षाव केला. तेव्हांपासून येथें विपुल पाणी होऊन हे वृक्ष सदा सुफलित होऊन येथें डोलत आहेत. इतकें ऐकून रामचंद्र अयोध्येस गेले. तोंच तो ब्राह्मणही आपला पुत्र घेऊन रामदर्शनास आला. त्यानें रामचंद्राला त्या वेळीं अनंत आशीर्वाद दिले. ह्याप्रमाणें रामचंद्रानें सर्वांस सुखी ठेवून व सर्वांचे आशीर्वाद घेतघेतच

राज्य चालविलें. अशा त्या षड्गुणैश्वर्य संपन्न श्रीरामचंद्रास हें त्याचें चरित्ररूप सुंदर पुष्प अर्पण करून मी त्यास अनन्यभावेंकरून शरण जाऊन त्याची इतकीच प्रार्थना करीत आहें कीं, सर्व संकटांतून मला मुक्त करून माझ्यापासून अशीच वारंवार सेवा घेत असावें.

श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु.



# श्रीरामस्तुतिप्रारंभ.



श्रीगणेशाय नमः ॥ ॥ संसारसंगें बहु शीणलों मी ॥ कृपा करीं रे रघुराज स्वामी ॥ प्रारब्ध माझें सहसा टळेना ॥ तुजवीण रामा मज कंठवेना ॥ १ ॥ मन हें विकारी स्थिरता नव्हे रे ॥ त्याचेनि संगें भ्रमतें भलें रे ॥ अपूर्व कार्यें मन हें विटेना ॥ तुज० ॥ २ ॥ मायाप्रपंचीं बहु गुंतलों रे ॥ विशाळ व्याधीमधें बांधलों रे ॥ देहाभिमानें अति राहवेना ॥ तुज० ॥ ३ ॥ दारिद्र्यदुःखें बहु कष्टलों मी ॥ संसारमायेंतचि गुंतलों मी ॥ संचीत माझें मजला कळेना ॥ तुज० ॥ ४ ॥ लक्ष्मीविलासीं बहु सौख्य वाटे ॥ श्रीराम ध्यातां मनिं कष्ट मोठे ॥ प्रपंचवार्ता वदतां विटेना ॥ तुज० ॥ ५ ॥ अहोरात्रें धंदा करितां पुरेना ॥ प्रारब्धयोगें मग राहवेना ॥ भवदुःख माझें कधिंही टळेना ॥ तुज० ॥ ६ ॥ तीर्थासि जातां बहु दुःख वाटे ॥ विषयांतरीं राहुनि सौख्य वाटे ॥ स्वहीत माझें मजला कळेना ॥ तुज०॥७॥ मी कोठुनी कोण आलों कसा हो ॥ स्त्रीपुत्रस्वप्नांतचि गुंतलों हो ॥ ऐसें कळोनीं मन हें विटेना ॥ तुज० ॥ ८ ॥ असत्य वाक्यांनिं मुकाचि झालों ॥ अदत्तदोषें दुःखीं बुडालों ॥ ही पूर्ण करणी कशि आठवेना ॥ तुज० ॥९॥ आनंदमूर्ती भज रामसिंधू ॥ चैतन्यस्वामी निजदीनबंधू ॥ अभ्यंतरीं प्रेम मनीं ठसेना ॥ तुज० ॥ १० ॥ विश्रांति देहीं अणुमात्र नाहीं ॥ कुळाभिमानें पडलों प्रवाहीं ॥ अशांतुनी दूर कधीं कळेना ॥ तुज० ॥ ११ ॥ विषयीं जनांनीं मज आळवीलें ॥ प्रपंचपाशांतचि बूडवीलें ॥ स्वहीत माझें होतां दिसेना ॥ तुज० ॥ १२ ॥ नरदेहदोषां वर्णूं किती रे ॥ उच्चाट माझे मनिं वाटली रे ॥ ललाटरेषा कधिं पालटेना ॥ तुज० ॥ १३ ॥ मजला अनाथा प्रभु तूंच दाता ॥ मी मूढ कीं जाण असेंच आतां ॥ दासा मनीं आठव वीसरेना ॥ तुज० ॥ १४ ॥ इति रामस्तुतिः समाप्ता ॥